मनोहर ग्रंथमाला, प्रकाशन २ रें

# विस्तवाशीं खेळ

( स्वतंत्र सामाजिक नाटक )

वा. म. जोशी
( रागिणी, आश्रम-हरिणी, नीतिशास्त्र-प्रवेश,
वगैरे पुस्तकांचे कर्ते )

किंमत १ रुपया

# " प्रकाशकाचें पान "



'तिरंगी नवमतवाद' हें मनोहर-ग्रंथमालेचें पहिलें प्रकाशन. त्यानंतर अवघ्या एकच महिन्यांत श्री. तात्यासाहेब जोशी यांचें 'विस्तवाशीं खेळ' प्रकाशित करण्याचा सुयोग लाभत आहे ह्याबद्दल त्यांचे आभार मानणें आपुलकीच्या नात्यास सोडून असलें तरी व्यवहारास धरूनच आहे.

पुस्तकाच्या छपाईबद्दल श्री. राजगुरु यांचेही आभार मानले पाहिजेत.

मालेच्या पहिल्या प्रकाशनाप्रमाणेंच याचेंही रसिक वाचक स्वागत करतीलच. मालेचें तिसरें प्रकाशन श्री. तात्यासाहेब केळकर यांचें " फ्रेंच राज्यक्रांति " हें पुढील महिन्यांत वाचकांना मिळेल. संदर्भग्रंथसूचि, विषय-सूचि, नेपोलियनचें आपल्या मुलास पत्र, नेपोलियन, मेरी अँटॉइनेट व इतर तत्कालिन फ्रेंच राजकारणाशीं संबंध आलेल्या महत्त्वाच्या व्यक्तींचीं सुंदर छायाचित्रें वगैरे घालून आधींच मौल्यवान असलेलें पुस्तक अधिक आकर्षक व सुंदर करण्याची खटपट केलेली आहे.

पुस्तकाचा योग्य आदर होईल अशी खात्री बाळगतों.

मनोहर-ग्रंथमाला, पुणें.
१९६/३ सदाशिव,
ता. ८।२।३७.

— मनोहर महादेव केळकर

## प्रो. वा. म. जोशी यांचीं पुस्तकें



१ नीतिशास्त्र-प्रवेश

२ साक्रेटिसाचे संवाद ( प्रती खलास )

३ आश्रम-हरिणी

४ रागिणी

५ नलिनी

६ इन्दु काळे व सरला भोळे

७ विचार-विलास ( प्रती खलास )

८ वाङ्मय माला भाग १ } ना. म. पटवर्धन

९ ,, ,, २ } यांच्या सहकारितेनें

१० नव-पुष्प-करंडक

---

## प्रो. महादेव मल्हार जोशी यांचें पुस्तक

१ स्वामी सच्चिदानंदांचीं पत्रें

त्यांतच ( आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त समाविष्ट केला आहे. )

# विस्तवाशीं खेळ

## अंक पहिला

[ स्थळः—अमृतराव जहागिरदार यांच्या वाड्याबाहेरील बाग, अमृतराव उदास व विचाराक्रांत मुद्रेनें प्रवेश करतो. ]

अमृतराव —

काांहीं मला न ठावें । सुज्ञीं कुणीं वदावें ॥
देवा कसें करावें ? । कोणास मीं भजावें ॥
आईस मीं भजावें । परि तीस नेलि देवें ॥
देशा, तुला भजावें । प्रेमा म्हणे रमावें ॥
कोणा कसें वरावें ? । कोणा कसें त्यजावें ? ॥
कांहीं मला न ठावें । सुज्ञीं कुणी वदावें ॥

अति विचार करण्यांत अर्थ नाहीं. हॅम्लेटसारखा प्रकार व्हायचा. तेव्हां मनांत योजलेला निश्चय, विचारांत वेळ न दवडतां, कायम करायचा आणि ताबडतोब अमलांत आणावयाचा, हें ठरलं. आधीं आतां वस्तुस्थिति आपल्या आश्रितांना सांगून टाकावी. ( नर्मदेला व अंगारला हांक मारतो. ) नर्मदा, अंगार इकडे या. ( येतात. ) माझी जहागीर सरकार जप्त करणार आहे. हा वाडा लवकरच सरकारजमा होणार आहे. मी आतां नांवापुरतांच जहागिरदार!

**अंगार** —अं ? काय–म्हणतां काय ?

**नर्मदा** —सरकारनं असं कसं केलं हो ?

**अमृत** —सरकारची चूक नाहीं. सरकारकडे कोणी खोटे रिपोर्ट पाठविले, कीं मी आणि विजया बंडखोर कम्युनिस्ट लोकांपैकीं आहोंत आणि आमच्याकडे दोन पिस्तुलं लपविलेलीं आहेत.

**अंगार** —विजयाताई कम्युनिस्ट असतील; त्या कांहीं तरीच बोलत असतात. त्या स्वतः नवमतवादी का कायसंसं म्हणवून घेतात, पण आपण तशांतले मुळींच नाहीं.

**अमृत** —विजयाहि कम्युनिस्ट नाहीं आणि मीहि नाहीं. ती बोलण्यांत फटकळ आहे, पण तिचं मन शुद्ध आणि उदार आहे.

**अंगार** —तश्या त्या चांगल्याच आहेत. आपल्याकडे येणारी सगळीच मंडळी चांगली असायची. चंद्रिकाताई—

**अमृत** —तुमचा तोंडपुजेपणा आतां पुरे करा. मला तो आवडत नाहीं हें कितीदां सांगायचं ? आणि तोंडपुजेपणा करून आतां फायदाहि होण्यासारखा नाहीं. कारण माझा वाडा, माझी जहागीर आणि माझी जंगम मालमत्ताहि लवकरच जप्त होणार आहे असं मला कळलं आहे. हें गांव सोडून जायचं नाहीं असाहि निर्बंध घालणार आहेत म्हणे. महिना फक्त पन्नास रुपयांचा तनखा सरकारांतून मेहेरबानी दाखल मिळायचा आहे. राजद्रोहाचा खटला होऊन आठ-दहा वर्षं कैदेंतहि जावं लागेल कदाचित्. तेव्हां माझ्याकडची नोकरी संपलीच समजा.

**अंगार** —दैवाची गति विलक्षण म्हणतात ती अशी. 'तखादिरापुढं मगदुराचं कांहीं चालत नाहीं' म्हणतात तेंच खरं.

**अमृत** —तुझं तत्त्वज्ञान पुरें झालं. इतक्या दिवस बऱ्या-वाईट रीतीनं तुम्हांला सांभाळलं पण आतां यापुढं—

**अंगार** —आपले पाय सोडून आम्ही कुठं जायचं ? ज्याच्यावर घरटं बांधलं त्या झाडाला सोडून पाखरानं कुठं जावं ?

**नर्मदा** —मी आपली तुमच्यापाशींच राहणार ! नातं नाहीं, कांहीं नाहीं, तरी अनाथ म्हणून इतके दिवस सांभाळलंत तसंच पुढंहि—

**अमृत** —मीं तुमची व्यवस्था करून ठेवली आहे. अलीकडे तीन-चार दिवस तुझा मित्र कुठार का कोणसा आला आहे ना त्याला आतां जायला सांग. माझ्याकडे त्याची आतां सोय व्हायची नाहीं, आणि तुझी मी माझ्या

जीवश्चकंठश्च मित्राकडे रवानगी करणार आहें. विभाकरपंताची वकिली आज-काल साधारण बरी चालली आहे, त्यांना एका कारकुनाची जरूरी आहे आणि नर्मदा, तुला देखील ते आपल्या भाच्यांना आणि पुतण्यांना मास्तरीण म्हणून ठेवतील असं मला वाटतं. विभाकरपंत माझं एवढं ऐकतील अशी माझी खात्री आहे. त्यांनीं आतांपर्यंत माझी कोणतीहि विनंति अमान्य केली नाहीं. मित्र असावा तर असा असावा. जा– रडूं नका– जा. ऐकत नाहीं हुकूम ?

**नर्मदा** —मी आपल्याकडेच राहतें. विभाकरपंतांकडे नाहीं जाणार मी.

**अमृत** —कां ? ते अविवाहित आहेत म्हणून ? अविवाहित असले म्हणून काय झालं ? त्यांच्याकडे त्यांची आई आहे, त्यांच्याकडे बायका माणसं, भाच्या, पुतण्या, मुलंबाळं आहेत, त्यांच्याकडे राह्यला संकोच नको वाटायला.

**नर्मदा** —पण मी नाहीं आपले पाय सोडून जायची. ( रडूं लागते.)

**अंगार** —मीहि नाहीं जायचा. ( डोळ्यांना हातरुमाल लावतो. )

**अमृत** —रडूं नका. जा, मी सांगतों तसंच झालं पाहिजे. जा, जात नाहीं ? माझं ऐकत नाहीं ? बाकी तुमचंहि बरोबरच आहे ! जोंपर्यंत दाम तोंपर्यंत मान, असा जगाचा न्यायच आहे ! जहागीर जाणार असं कळल्यावर तुम्हीं तरी हुकूम कां म्हणून ऐकावा ? हुकूम करणारा मीच वेडा—पण नाहीं. आज तरी या वाड्याचा मालक आहें—जा. इथून निघून जा– नाहीं तर हात धरून घालवून देतों. ( रडत जाऊं लागतात. ) अस्सं. मेजवानीची सगळी व्यवस्था मीं सांगितल्याप्रमाणं झाली आहे ना ?

**अंगार** —जहागीर जाणार म्हणतां आणि मेजवानीचा बेत करवला तरी कसा ?

**अमृत** —अस्संच आहे माझं. अस्ताला जाण्यापूर्वी सूर्य नाहीं का रंगी-बेरंगी देखाव्यांची लयलूट करीत ? अरे, पण जरा थांबा ! अंगार इकडे ये. विभाकरपंत आतां येतील, त्यांना इकडेच पाठवून दे. कांहीं वेळानं विजया आणि चंद्रिका येतील, त्यांना पण इकडे पाठव. त्यांना आज या बागेतील शेवटली मेजवानी आहे.

**अंगार** —आपल्यापुढें आम्हीं काय बोलायचं ? आणि आमचं काय

तुम्ही ऐकणार आहांत? आपल्या मातोश्री येवढ्या आपणांला पूज्य, पण त्यांचंहि आपणांपुढं चालत नव्हतं, मग आमचं काय चालणार आहे?

**अमृत**—मंडळी आली कीं, त्यांना इकडे पाठवून द्या. चला—जा. [ अंगार व नर्मदा जातात. ] विजयेच्या वडिलांच्याशिवाय दुसऱ्या सावकारांच्या कर्जांतून जहागीर सोडवली; पण ती जप्तच होणार आहे! जहागीर जाण्याचं मला विशेष नाहीं वाटत; पण या आश्रितांचं कसं होईल? आणि माझ्या चंद्रिकेचं कसं होणार? ती माझ्यावर प्रेम करीत नसती तर फार चांगलं झालं असतं. उद्धवराव म्हणत आहेत त्याप्रमाणं त्यांच्या चक्रधराशीं तिनें लग्न करून घेतलं तर किती चांगलं होईल! उद्धवरावानं त्याला मुलगा म्हणून संभाविलेला आहे, आणि चक्रधर बी. ए. आहे आणि तसा कांहीं वाईट नाहीं. माझ्या देशभक्तीमुळं माझ्यावर असे बिकट प्रसंग येणारच. तेव्हां चंद्रिकेशीं लग्न करण्याचा विचार आपण सोडून दिला पाहिजे. पण ती ऐकतच नाहीं त्याला काय करायचं? ती इतकी चांगली नसती तर फार चांगलं झालं असतं. तें कांहीं नाहीं. फूल कितीहि चांगलं असलं आणि तें आपणांस कितीहि आवडत असलं तरी विस्तवाशींच ज्याचा खेळ चालला आहे, त्यांनं तें जवळ बाळगूं नये. –बस्स. ठरलं तें ठरलं. माझे काय हाल होणार असतील ते होवोत; पण त्या गुलाबाच्या फुलाला माझ्या दारिद्र्याची झळ लागूं देणार नाहीं.—मला पुनः पुन्हा वाटतं, कीं ती इतकी चांगली नसती तर किती चांगलं झालं असतं! तें कांहीं नाहीं. हरिभाऊ आपट्यांच्या भावानन्दानं आपल्या आवडत्या 'सुंदरी'शीं लग्न करण्याचं जसं नाकारलं तसंच मीहि करणार. देशभक्तीच्या यज्ञांत जहागिरीप्रमाणं प्रेमाची आहुति घातली पाहिजे. (पद गुणगुणतो.)

(डॉ. रोखीवाले प्रवेश करतात.)

**अमृत**—काय डॉ. रोखीवाले, इकडे कोणीकडे? बिल वसूल करायला का?

**रोखी०**–तें एक काम आहेच. पण दुसरं असं काम आहे कीं, आपल्याला एक महत्त्वाची बातमी सांगायची आहे जरा एकीकडे या. (कानांत) आपल्यावर सरकार राजद्रोहाबद्दल खटला करणार आहे आणि जहागीर जप्त करणार आहे असं—

**अमृत** —मला कळली आहे ही बातमी.

**रोखी०** —बरं मग मी जातों. हें सांगण्याकरितांच आलों होतों.

**अमृत** —मग बिलाचे पैसे नकोत ना ?

**रोखी०** —ते नाहीं सुटायचे हां. तुमच्यासारखे तरुण लोक प्रेमाला जें महत्त्व देतात, तें मी द्रव्याला देतों ! हो, बरी आठवण झाली. मी एक कामशास्त्रावर पुस्तक लिहीत आहे--हॅवलॉक एलिससारखं—तुम्हांला ठाऊक आहे. तुमच्या प्रेमकथेची हकीकत मला सांगाल का ? मी ती गुप्त ठेवीन. चंद्रिकाताईचं आणि तुमचं लग्न कसं जुळलं ? विकृत जिज्ञासेनं मी विचारीत नाहीं, तर प्रेमशास्त्राच्या ज्ञानांत भर घालावी या महत्त्वाकांक्षेनं.

**अमृत** —चंद्रिकाताईचं आणि माझं प्रेम ? (विचार करून) आतां नाहींसं झालं आहे आणि--

**रोखी०** —आं ! आतां विजयेकडे नजर फिरली वाटतं ? अमृतराव रागावूं नका हं. मला कामशास्त्र लिहिण्याचं वेडच आहे म्हणा ना, म्हणून मला असल्या गोष्टी विचाराव्याशा वाटतात. तुमच्या खऱ्या गोष्टी--अगदीं खऱ्या खऱ्या सांगितल्यात तर माझ्या पुस्तकाला......

**अमृत** —पाहूं मग पुढें; आतां मी कामांत आहे. कांहीं मंडळी यायची आहेत. (पाहून) विभाकर आलाच वाटतं !

**रोखी०** --बरं जातों मी. [ जातो.

(**अंगार व नर्मदा विभाकरपंतास** घेऊन येतात.)

**विभाकर** —काय रे ! आज कशाकरितां मेजवानी ? तुझा आणि चंद्रिकेचा वाङ्निश्चय निश्चित झाला वाटतं ?

**अमृत** —वाङ्निश्चय टरला नाहीं. माझी जहागीर जप्त करण्याचं सरकारनं ठरवलं आहे. विभाकर, या जहागिरदाराकडची ही शेवटची मेजवानी आहे !

**विभाकर**— म्हणजे ?

**अमृत** —माझी जहागीर आज उद्यां जप्त होणार अशी बातमी आली आहे.

**विभाकर** —भीति होती ती खरी ठरली म्हणायची ! कोणी सांगितली ही बातमी ?

**अमृत** —( कानांत )...यांनीं. आणि डॉक्टर रोखीवाल्यांनीं आतां येऊन तेंच सांगितलं. विलायतेहून कोणी तरी चोरून आणलेल्या नऊ पिस्तुलांपैकीं दोहोंचा पत्ता लागत नव्हता, ती मीं लपवून ठेविलीं आहेत असा पोलिसांचा संशय आहे. शिवाय राजद्रोही भाषण केलं असा आरोप आहे.

**विभाकर** —डॉक्टर रोखीवाले केव्हां आले होते? आणि कशाला आले होते?

**अमृत** —आतांच येऊन गेले. बिल मागायला आणि—माझ्या प्रेमाची कुळकथा विचारायला? ( स्वर बदलून ) विभाकर, माझी आई वारली हें किती चांगलं झालं! ती जर आज असती तर तिचं दुःख पाहून माझं काय झालं असतं, मला सांगतां येत नाहीं.

**विभाकर** —अशा वेळीं प्रेमाचीं माणसं नसावींत हेंच बरं. ( सुस्कारा सोडून ) सरकारचा केव्हां गैरसमज जाणार कोणास ठाऊक? बाकी, कांहीं रिपोर्टरांना व्याख्यान समजण्याची अक्कल बेताचीच असते, तेव्हां अशा गोष्टी व्हायच्याच. त्यांत वरिष्ठ अधिकाऱ्यांचा दोष आहे असं मला मुळींच वाटत नाहीं. बरं, मी आतां डॉ. रोखीवाल्यांच्याकडे जाऊन येतों; त्यांना एका केसची माहिती पाहिजे आहे.

**अमृत** —कसली केस?—

**विभाकर** —नादिष्ट आहे तो. स्त्री-पुरुषांच्या प्रेमावर हा आधुनिक वात्स्यायन हॅवलॉक-एलिससारखं पुस्तक लिहीत आहे, त्यासंबंधीं माहिती पाहिजे आहे त्याला. तुझी चंद्रिका येणार आहे ना? ती तर येणारच म्हणा! तुझ्याकडची मेजवानी आणि चंद्रिका नाहीं म्हणजे चंद्रिकेशिवाय चंद्र विहार करीत आहे असंच म्हणण्यासारखं आहे!

**अमृत** —माझ्या चंद्रिकेबद्दल तुला विचारायचं नाहीं; तर तुझी विजया येणार आहे कीं नाहीं, हें विचारायचं आहे. तीहि येणार आहे बरं. चंद्राच्या चंद्रिकेबरोबर शुक्राची चांदणीहि कधीं कधीं दिसते ना?

**विभाकर** —असं!—गरिबाची उगाच आपली थट्टा—

**अमृत** —बरं जा आतां. लवकर ये. बाकी तुझी विजया येणार आहे, तेव्हां तूं लवकर येणारच म्हणा—

**विभाकर** —अरे, कसली आली आहे माझी विजया? ती दाद लागूं देत

नाहीं अजून ! परब्रह्माचं गूढ एक वेळ समजेल पण प्रेमब्रह्माचं गूढ समजणार नाहीं असं डॉ. रोखीवाले म्हणतात तें खोटं नाहीं. माझ्यामधें फारसा स्वार्थत्याग नाहीं, सामाजिक सुधारणेची विशेष तळमळ नाहीं, राजकारणांत माझ्या हातून कांहीं धाडसी पराक्रम होत नाहीं, असं तिचं म्हणणं. खरं बोलायचं म्हणजे तुझ्याशीं माझी मनांत तुलना करून ती मला कमी लेखते. तुझे गुण माझ्या आड येताहेत !

**अमृत** —( गंभीर स्वरांत ) विभाकर, तुला एक गंभीर गोष्ट सांगूं का ?

**विभाकर** —चंद्रिकेच्या आणि तुझ्या लग्नाचं कांहीं तरी—

**अमृत** —होय. लग्नाचंच सांगायचं आहे. आमचं लग्न मोडलं—नव्हे मोडणार—म्हणजे मी मोडणार ! 'लग्न नव्हे मरण उद्यां' असं मी शारदेप्रमाणं—पण निराळ्या अर्थानें म्हणूं शकेन.

**विभाकर** —मला बनविण्याची कांहीं तरी युक्ति दिसते आहे. बरं आतां जातों. परत आल्यावर तुझ्यावरच्या संकटाला कसं तोंड द्यायचं, त्याचा विचार करूं.

**अमृत** —परत आल्यावर तुला एक नाटक पाहायला मिळणार आहे. मीच त्याचा सूत्रधार—मीच नायक–मीच कलिपुरुष—

**विभाकर** —बरं आहे मागाहून बोलूं.

**अमृत** —आतांच थोडंसं बोललं पाहिजे. मी एक प्रेमाचं नाटक करून चंद्रिकेशीं ठरलेलं लग्न मोडणार आहे.

**विभाकर** —मला कांहीं नाहीं हें समजत. मला लवकर गेलं पाहिजे. आलोंच मी —( पाहून ) ती पहा चंद्रिकाच येत आहे. तिच्याशीं जरा बोलत बस. तिच्याबरोबर विजयाहि दिसत आहे.

**अमृत** —म्हणूनच थांब जरा. विजयेशीं बोलायचं नाहीं ?

**विभाकर** —आतां नाहीं. मला आतां गेलंच पाहिजे.

[ **चंद्रिका** व **विजया** येतात. विभाकर त्यांना नमस्कार करून जरा घाईनेंच जातो.]

**अमृत** —विजये, तुझी किती वेळ वाट पाहात होतों.

**चंद्रिका** —माझी नव्हतांना वाट पाहात ? हिची तेवढी मार्गप्रतीक्षा !

आतां आमची कोण मार्गप्रतीक्षा करतो ? माणूस एकदां हस्तगत झाल्यासारखं वाटल्यावर मग कोण पर्वा करतो ?

**अमृत** —तसं नाहीं. हिच्या नवमतवादी मतांमुळें आणि वागणुकीमुळें हिच्याकडे अधिक लक्ष वेधतं! विभाकरासारख्याचं तर मनहि... पण जाऊं द्या. न बोललेलंच बरं.

**विजया** —अस्सं! बोला-बोला. पुरतं बोला—

**चंद्रिका** —बोललें तेवढं पुरेसं नाहीं झालं वाटतं?

**विजया** —आम्हा साध्या-सुध्या नवमतवाद्यांना खोटी लाज आवडत नाहीं. साध्याला कशाची बाधा नाहीं, 'बाजी'ला मात्र लाजेची गरज असते, असं आमचं मत आहे.

**चंद्रिका** —अनुप्रास चांगला आहे.

**विजया** —आणि तत्त्वहि बरोबर आहे.

**चंद्रिका** —पण तपशील खोटा आहे.

**विजया** —नाहीं. तपशील बरोबर आहे. विभाकरपंतांचं नांव घेऊन तुम्हांला सुचवायचं आहे, कीं आमचं प्रेम जुळलं आहे, पण खरी गोष्ट अशी आहे कीं, प्रेमाऐवजीं आज भांडण मात्र चांगलं जुपलं होतं खरं!

**अमृत** —बसा तर खऱ्या. का विभाकराशीं भांडण झालं म्हणून माझ्याशींहि भांडण करायचं आहे? (बसतात. कान गोष्टी करतात.)

**चंद्रिका** —काय चाललंय् बोलणं?

**अमृत** —कांहीं नाहीं–कांहीं नाहीं. (पुन्हा कानगोष्टी करतात–हंसतात.)

**चंद्रिका** —(रागानें) तिच्याशींच जर कानगोष्टी करायच्या होत्या, तर मला कशाला बोलावलं?

**अमृत** —तुम्हांला सांगण्यासारख्या नाहींत आमच्या गोष्टी!

**चंद्रिका** —अस्सं! (कानगोष्टी चालू ठेवतात.)

**विजया** —(एकीकडे) अशा कानगोष्टी करतांना मला आनंद होत आहे. कां बरं? (उघड) किती वाजले बरं?

**अमृत** —विभाकर कां बरं अजून येत नाहीं? चक्रधरालाहि पण बोलावलं होतं. तोहि अजून आला नाहीं. चक्रधर मंडळींत बोलतचालत पण गरीब सालस मनुष्य आहे.

**चंद्रिका**—कांहीं तरी लपवाछपवी चालली आहे. मला सगळं समजतं बरं का?

**अमृत**—खरं सांगायचं म्हणजे तुमच्याशीं मला आतां बोलावंसं वाटत नाहीं. बोलायची आतां वेळ राहिली नाहीं. करण्याची वेळ आली आहे.

**विजया**—वाङ्‌निश्चय करण्याची ना?

( नर्मदा चहाची केटल वगैरे आणते व जाते. )

**अमृत**—भांडण करून वाङ्‌निश्चय मोडण्याची!

**चंद्रिका**—कांहीं तरी बोलून तुमचं गुपीत माझ्यापासून लपवायचं आहे. मला या गोष्टी समजतात बरं! चहा ओतूं का?

**अमृत**—नको. विभाकर आल्यावर घेईन.

**विजया**—घ्या हो. विभाकरपंत आल्यावर पुन्हा घेतां येईल. घ्या. मी ओततें. ( तो कप पुढे करून चहा घेतो. )

**चंद्रिका**—मी देत होतें तेव्हां नको होता. आत्तां अर्ध्या मिनिटांत हवासा झाला. एकेकाच्या हातचा आणि बोलण्याचा असा गुण असतो! म्हणतात ना, 'लाडकीचे हात आणि काय करी मात'!

**अमृत**—( चंद्रिकेस ) घ्या–बिस्किटं–केक्स—

**विजया**—घ्या? 'घे' सोडून 'घ्या'वर केव्हांपासून आलेत?

**अमृत**—पुरुष एकवचनी नसतात– मीं हिला दिल्यासारखं केलेलं एक वचन आजपासून मोडणार आहें.

**विजया**—कोणतं वचन?

**अमृत**—सागतों–सांगतों–( विजयेच्या कानांत सांगतो.) चंद्रिकेस नंतर ) घ्या ही केक–पेढा–बर्फी—

**चंद्रिका**—येवढा प्रेमाचा पान्हा नको यायला! तुमचीं कान-खलबतं खुशाल चालूं द्यात. तुमच्या दोघांच्या गुजगोष्टींत माझी अडचण कशाला? म्हणतात ना, दोघांच्या कानगोष्टी आणि तिसरा होतो कष्टी! मी आपली जातें. ( जाऊं लागते. )

**अमृत**—चंद्रिके, मी तुझा अपराधी आहें; तुझ्यावर माझं प्रेम एके काळीं होतं, पण आतां नाहीं.

**चंद्रिका**—कां बरं? मीं काय केलं आहे?

**अमृत**--तूं कांहीं केलं नाहींस, मीच वाईट आहें, दुष्ट आहें, पाजी आहें म्हण पाहिजे तर. तुम्ही बायका पुरुषांना भ्रमराची उपमा देतां, पण ती माझ्या बाबतींत फार सौम्य आहे. मी गरीब गाईंना मारून खाणारा वाघ आहें!

**विजया**—हें आज कसलं नाटक चालवलं आहे?

**अमृत**--प्रेमाचं! चंद्रिकेला हें नाटक दुःखान्त होणार आहे आणि दुसऱ्या कोणाला तरी सुखान्त वाटेल अशी मला आशा आहे. (चंद्रिकेस) चंद्रिके, तूं रागावशील, पण खरी गोष्ट, तुझ्या हिताची गोष्ट, तुला सांगतों, माझ्यावर प्रेम करण्याचं सोडून दे. दुसऱ्या कोणा सज्जनावर प्रेम कर.

**चंद्रिका**—तरुणपणीं प्रेम करणं म्हणजे कुठल्या तरी कॉलेजांत नांव घालण्यासारखं का आहे? प्रेम हें जर मुलांनीं एक कॉलेज सोडून दुसऱ्या कॉलेजांत नांव घालण्यासारखं असतं, तर एकावर प्रेम करण्याचं सोडून दुसऱ्यावर मीं प्रेम केलं असतं. (स्वर बदलून) मेजवानीला बोलावून हें आज काय चालवलं आहे? मला चिडवण्याची नवीन तऱ्हा तर नाहीं ही? मी मघांशी खरोखरीच चिडलें होतें. आतां मला समजलं मघांशी कसली खलबतं चाललीं होतीं तीं! मला चिडवण्याचा कट करीत होतां तुम्ही! खरं ना? कसं ओळखलं मीं?

**विजया**--ही तुझी कांहीं तरीच कल्पना आहे. (अमृतरावांस) काय हो प्रेमपरायण देशभक्त! हें आज आपण काय चालवलं आहे? प्रणयकोपाचं हें सोंग--

**अमृतराव**—सोंग नाहीं, थट्टा नाहीं, कांहीं नाहीं. खरा प्रकार काय आहे तो सांगतों. विजये, तूं नवमतवादी आहेस. तूं मनाला येईल तें वाटेल तिथं बोलतेस. मीहि आतां तसंच करणार आहें. आडपडदा न ठेवतां, आढेवेढे न घेतां, एखादं सत्य सांगितलं तर तें संथपणानं ऐकशील का?

**विजया**--सांगा-खुशाल सांगा. प्रेमाशिवाय पुरुषांचीं दुसरीं सगळीं बोलणीं ऐकावयास तयार आहें! चंद्रिकेवर तुमचं खरं प्रेम आहे हें मला ठाऊक आहे. प्रेमचीम तुमच्या बोलण्यांत यायचं नाहींच; तेव्हां बिनधास्त बोला. कोणतंहि सत्य—गोड, कडू, उघडंनागडं, जसं असेल तसं—सांगा. सत्य—केवळ सत्य – आणि निर्भेळ सत्य मला नेहमींच ऐकावसं वाटतं.

**अमृत** —मग ऐक तर! विजये! चंद्रिकेला मी आतां रडवणार आहें.

**चंद्रिका** —कांहीं नाहीं ग विजये! काल माझ्या बोलण्यांतल्या इंग्रजीच्या चुका काढून मला रडविलं, तसं आतां पुन्हा रडवण्याची लहर आलेली दिसते; पण किती चिडवलं तरी आतां रडायची नाहीं.

**विजया** —बोला काय बोलायचं तें. बायकांसारखं लाजतां काय?

**चंद्रिका** —( लाडिक स्वरांत ) कालची ती मौज सांगायची नाहीं अं! भलत्या गोष्टी सांगितल्या तर मला नाहीं खपायच्या!

**अमृत** —मला मौज अशी वाटते कीं, स्वतःला फार शहाणा आणि नीतिमान् समजणारा मी सामान्य पुरुषांसारखाच चंचल वृत्तीचा आहें.

**विजया** —हें सत्य आहे—जुनंपुराणं सत्य आहे. तुमची चंचल उतावळी वृत्ति सगळ्यांना ठाऊक आहे.

**अमृत** —विजये! पुरुषांचं मन चंचल असतं हें लवकरच चंद्रिकेच्या प्रत्ययाला येणार आहे.

**चंद्रिका** —मला नाहीं वाटत पुरुषच तेवढे चंचल असतात; बायकाहि तशाच असतात. तसं पाहिलं तर वृक्ष जेवढे स्थिर असतात तशा वेली कुठें असतात? समुद्रांत कधीं कधीं वादळ उत्पन्न होतं, पण त्यांत नद्यांतल्यासारखीं पदोपदीं वांकडीं वळणं नसतात.

**विजया** —अग्या! काव्य करूं लागली कीं ही! ( अमृतास ) बरं तुमचं सत्य येऊं द्या तोंडावाटे!

**अमृत** —विजये, माझं मन चंद्रिकेवरून उडालं आहे!

**विजया** —हें नाटक चाललं आहे कीं काय?

**अमृत** —नाहीं. माझं प्रेम इतके दिवस चंद्रिकेकडे गहाण ठेवलं होतं; पण आतां तें सोडवून दुसऱ्या कोणाच्या तरी चरणीं अर्पण करावं असें वाटूं लागलं आहे.

**चंद्रिका** —याला नाटकीपणा म्हणायचा नाहीं तर काय म्हणायचं बाई!

**अमृत** —नाटकी भाषा नाहीं तर खरंखुरं मर्मभेदक भाषण, तुझा जीव घेणारं भाषण आहे हें. चंद्रिके, तूं सुस्वरूप आहेस, गुणांनीं चांगली आहेस, पण चंद्रकलेची महती कोठपर्यंत, तर सूर्यप्रभा दिसूं लागली नाहीं तोंपर्यंतच. गारगोटीची किंमत हिऱ्यापुढं काय आहे?

**चंद्रिका** --पण गारगोटीला मुद्दाम बोलावून आणून तिला हें सांगण्याची काय जरूरी होती ?

**अमृत** —जरूर ? आजचं काम उद्यांवर टाकण्यासारखं नव्हतं ? विजये, पुरुषाचं मन कसं असतं हें तुला सांगितलं ना ?

**विजया** —पण शहाणे पुरुष आपलं मन आवरून धरतात !

**अमृत** —पण शहाणपणा राहिला असेल तर ना ?

**विजया** —कसला खेळ चालला्य् हा ? (मनांत) हा खेळ असला तरी मला आनंद होत आहे. मनुष्याचं मन असं आहे !

**अमृत** --तुला हा खेळ करतों आहे असं वाटत असेल; पण हा माझा खेळ नसून मरण आहे ! माझं नैतिक मरण हें !

**चंद्रिका** —(रागानें) तुमचं मरण नाहीं, तुम्हांला चांगलं सुंदर जीवन मिळेल ! माझं मात्र मरण ओढवलं आहे खरं ! बरं आहे. आतां जातें. उषेची आणि सूर्याची गांठ पडली म्हणजे चांद्रिकेनं आपली वाट सुधारावी हें चांगलं !

[ जाऊं लागते.

**विजया** --थांब, मलाहि यायचं आहे- (अमृतरावांस) जाऊन येतों बरं का आम्ही ! (दोघी जाऊं लागतात.)

**अमृत** —जा. जरा थांबून पण नका जाऊं, मला कांहीं समजत नाहीं. मनांत विचारांच्या लाटा आणि भावनांचा कल्लोळ उत्पन्न होऊन माझं डोकं सुन्न झालं आहे. पुन्हा भेटल्याशिवाय मात्र जाऊं नका; नाहीं तर-जरा थांबा. पूर्वीचा आतां मी राहिलेला नाहीं हें स्पष्टपणानं सांगायचं उगाच लांबणीवर टाकून काय फायदा ? एक घाव आणि दोन तुकडे करून टाकावेत झालं. चंद्रिके, तुला कितीदां सांगितलं, कीं माझ्याशीं लग्न करणं इष्ट नाहीं.

**चंद्रिका** --विजयेनं करणं इष्ट आहे ना ? पण तिच्या इस्टेटीमुळं हा इष्टपणा आला असेल बहुधा !

**अमृत** --काय पाहिजे तें म्हण ! पण तुझ्याशीं विवाहबद्ध होणं आतां मला इष्ट वाटत नाहीं. मला देशकार्यांत देह झिजवायचा आहे; प्रेमलीलांत मला राम वाटत नाहीं. तुझ्याशीं लग्न करून कायमची बेडी अडकविण्याला—(**अंगार** येतो.)

**अंगार** --कोणी आलं आहे बाहेर.

**अमृत** –भेटणाऱ्याची काय ब्याद आहे शिंची ! कामांत आहे म्हणून सांग.

**अंगार** —पण–पण–तो–पोलिसांचा जमादार आहे.

**अमृत** --जमादार असो नाहीं तर फौजदार असो. मला आतां भेटायचं नाहीं. ( थांबून ) पण थांब. आलोंच म्हणून सांग. ( चंद्रिकेकडे व विजयेकडून वळून ) आलोंच बरं का जाऊन.

**विजया** —( चंद्रिकेच्या खांद्यावर हात ठेवून ) चंदू--

**चंद्रिका** --( हात झिडकारून ) इतका लाडिकपणा नको. झाला तेवढा पुरे.

**विजया** —चंदू ! आतांपर्यंत अमृतरावांनीं माझ्याशीं प्रेमाची गोष्ट कधीं काढली नाहीं. आमच्या आपल्या देशाच्या आणि समाजाच्या गोष्टी चालायच्या ! आज कांहीं तरी डोक्यांत वेड शिरलेलं दिसत आहे.

**चंद्रिका** --वेड लावणारीं माणसं असलीं, कीं वेड लागतं !

**विजया** —तूं कांहींहि घालून पाडून बोल; पण तुला खरं सांगतें, कीं ते माझे पुष्कळ दिवसांचे स्नेही या नात्यानें आम्ही राजकारणांत सहकारी म्हणून काम करतों एवढंच. ( मनांत ) मी बोलत आहें हें खरं आहे, पण शंभर टक्के खरं आहे का ?

**चंद्रिका** --राजकारणाबरोबर प्रेमकारणांतहि आतां काम करूं लागलां आहांत, असंच ना ? हाच ना तुमचा नवमतवाद ?

**विजया** --मला याहून कुजकं बोलतां येईल. माझ्या जिभेला कांहीं कमी धार नाहीं--पण तुला खरं सांगतें ( पाहून) ते पहा विभाकरपंत आले वाटतं.

( **विभाकर** प्रवेश करतो. )

**विभाकर** --अमृतराव कुठें आहे ?

**चंद्रिका** —जमादार का फौजदार कोणी आले आहेत त्यांना भेटून एक-दोन मिनिटांत येत आहेत.

**विभाकर** —काय मैत्रिणींच्या गप्पा चालल्या होत्या ?

**विजया** —गप्पा चालल्या नव्हत्या, भांडण चाललं होतं.

**विभाकर** —आं ! कां बोवा !

**विजया** —तसंच आहे कारण ! या असे. बसा– ( जवळची खुर्ची देऊं लागते. )

**विभाकर** —नको, इथें बरा आहे.

**विजया** —असं बायकांसारखं लाजतां काय? हें नवीन युग आहे.

**विभाकर** —मी तुमच्यासारखा नवमतवादी नाहीं ना!

**विजया** —म्हणून तर मला आवडत नाहीं. तुम्हांला माझं प्रेम पाहिजे, पण मी जवळ नको! असं कसं चालेल?

**विभाकर** —प्रेम मिळाल्यावर जवळ बसतां येईल!

**विजया** —पण जवळ बसल्याशिवाय प्रेम मिळत नाहीं! मी आपली आहें नवमतवादी. खरं आहे तें सरळ बोलतें. मला शिष्टपणाचा लपंडाव येत नाहीं.

**चंद्रिका** —अशिष्टपणाचा येतो ना पण? मित्रांशीं लपंडाव करतां येत नसेल; पण मैत्रिणीशीं करून केसानं गळा कापतां येतो!

**विजया** —मी मुळींच लपंडाव करीत नाहीं. करीत असतील तर ते अमृतराव करीत आहेत.

**विभाकर** —हें काय बोलतां हें? आहे काय हें प्रकरण?

**चंद्रिका** —आपल्या नवमतवादी विजयेचा हा नवा विजय!

**विजया** —चंदू, सध्यांच्या तुझ्या मनःस्थितींत तूं बोलत आहेस हें साहजिक आहे. मी रागावत नाहीं.

**चंद्रिका** —उपकार आहेत आपले. त्यांच्याशीं लग्न करून घ्या म्हणजे आणखी उपकार होतील!

**विजया** —तूं इतकं कुजकं बोलतेस तर मीहि विचारतें कां ग त्यांच्याशीं लग्न करूं नये? तुझ्यावरचं प्रेम नाहींसं झाल्यावर लग्नाचं वचन पाळण्यापेक्षां, तें मोडलेलंच बरं.

**चंद्रिका** —तूं उत्तेजन दिलं नसतंस, तर माझ्यावरचं प्रेम नाहींसं झालं नसतं.

**विजया** —मीं उत्तेजन दिलेलं नाहींच मुळीं; जाणून-उमजून तरी दिलेलं नाहीं. माझं यौवन, माझं रूप, माझं बोलणं-चालणं, माझा स्वभाव; यामुळं त्यांना न कळत उत्तेजन मिळालं असेल तर त्याला मी काय करूं? यौवन टाकून म्हातारी होऊं? रूप मुद्दाम कुरूप करून घेऊं? चांगलं बोलणं सोडून वेड्यासारखी बरळत सुटूं? आनंदी, सरळ, खेळाडू स्वभाव सोडून रडकी,

कपटी, तिरसट बनूं? बरं जाऊं दे! ही थट्टा केली. जरा बाजूला चल. तुझ्याशीं शांतपणें एकीकडे बोललं पाहिजे. खरंच तुझाच गैरसमज दूर करत्यें. (हात धरूं लागते. चंद्रिका झिडकारते.)

**विभाकर**—तुम्हीं दोघींनीं काय हें चालविलं आहे? मला तर वेड्यासारखं झालं आहे. कांहींच समजत नाहीं!

**विजया**—कधीं समजत होतं नाहीं तरी! (चंद्रिकेस) चल-चंदू, चल. बऱ्या-वाईट गोष्टी हसण्यावारी न्यायला शिकलं पाहिजे. अग, तुझ्यावरचं अमृतरावांचं प्रेम उडालं असलं तर त्यांचा तूं नाद सोड. असे किती तरी पेन्शनर तुला दाखवितें, कीं ते तुझ्याशीं आनंदानं लग्न करतील. पेन्शनर नको असतील तर काव्याचं वेड लागलेला एखादा कवि पहा, नाहीं तर स्त्रियांचा कैवार घेऊन लिहिणारा एखादा लघुकथालेखक निवडून काढ! तोहि तुला नको असेल तर—तर आमचा चक्रधर शेवटीं आहेच कीं! बरं, थट्टा नको तर राहिली. तुला अगदीं मनापासून खरं सांगतें, कीं अमृतरावांबद्दल मला आदर आहे, प्रेमहि वाटतं, पण त्यांच्यावर माझं तशा प्रकारचं प्रेम नाहीं–नाहीं–अगदीं गळ्याशपथ नाहीं!

**चंद्रिका**—आतां नसेल –पण पुढें—

**विजया**—पुढचं पुढें पाहतां येईल. पुढें काय होईल तें सांगायला मी काय पंडित रघुनाथशास्त्री ज्योतिषी आहे, का म्हापणकर आहे–का मोघे-शास्त्री आहे?

**विभाकर**—तुम्ही दोघी मांजरीसारख्या भांडत आहांत आणि मला इथं उंदरासारखं पहावं लागत आहे! जरा बसा तर खऱ्या! मला तुम्हांला कांहीं महत्त्वाच्या गोष्टी सांगावयाच्या आहेत. अमृतरावाच्या प्रेमाबद्दल तुम्ही आतां बोलत होतात, पण त्यांच्या जहागिरीची काय गत होणार आहे हें समजलं ना? सांगितलं आहे का त्यानें?

**विजया**—नाहीं! (एकमेकींकडे आश्चर्यानें पाहतात.)

**विभाकर**—अमृतरावांवर वज्राघात होणार आहे!

**विजया**—मला वाटलंच. कांहीं तरी मोठं संकट येऊन मनाला धक्का बसला आहे. त्याशिवाय ते असं भलंतसलंत बोलले नसते. चंदा! चल तिकडे. तुझी मला समजूत घातली पाहिजे.

**चंद्रिका** —कांहीं नको समजूत घालायला माझी—

**विभाकर** —चंद्रिके ! जा, माझं ऐक. माझी खात्री आहे, कीं तुझा गैर-समज झालेला आहे. ( विजयेस) विजये ! जा तिला घेऊन; आणि तिचा गैर-समज दूर कर ! ( विजया चंद्रिकेला घेऊन जाते. ) हें निराळंच प्रकरण उद्भवलेलं दिसतंय्. जगांत केव्हां केव्हां प्रेमामुळं इतके चमत्कारिक प्रसंग उत्पन्न होतात कीं त्यापुढं नाटकांतले प्रसंग कांहींच नाहींत. आजचे हे प्रकार पाहून मी तर हतबुद्ध झालों आहें. [ पद गुणगुणतो. ]

( **अमृतराव** येतो. )

**अमृत** —काय रे ! सचिंत कां बसला आहेस असा ?

**विभाकर** —अरे ! चंद्रिका आणि विजया आतां चांगल्या भांडत होत्या. तूं चांद्रिकेला कांहीं तरी भलतंसलतं बोलला असला पाहिजेस? काय बोललास? काय आहे प्रकरण ?

**अमृत** —मीं योजलेल्या नाटकाचा पहिला अंक आहे हा ! चंद्रिकेवरचं माझं प्रेम उडत चाललं आहे आणि विजयेवर तें जडत चाललं आहे असं नाटक करीत आहें मी.

**विभाकर** —मी परत आल्यावर नाटक पाहावयास मिळेल म्हणालास तें हें वाटतं ! अस्सं ! कां, असलं नाटक करण्याची बुद्धि सुचली ? लोकांना बोलायला कांहीं विषय मिळावा म्हणून ? रिकामटेकड्या गप्पीदासांच्या बिन-भांडवली बोलपटाला नवीन कथानक देऊन काय मिळवणार आहेस ? का उद्धवरावांनीं विजयेच्या नांवानं काढून ठेवलेल्या पैशावर तुझी खरीच नजर गेली आहे ?

**अमृतराव** —तुझी नजर तिच्या रूपावर आणि माझी तिच्या पैशावर, ही अधिकार-विभागणी ठीक आहे कीं नाहीं ? विभाकर, ही थट्टा सोडून खरं बोलायचं म्हणजे चंद्रिकेसारख्या सद्गुणी कोमल मुलीचे पुढें हाल होऊं नयेत म्हणून मी हें सगळ नाटक करीत आहें. विजयेवर तसं माझं प्रेम नाहीं हें ध्यानांत ठेव. नाहीं तर तुझ्या मनांत भलताच संशय यायचा !

**विभाकर** —आलाच होता क्षणभर. अमृतराव, शाहणा असलास तर असलं नाटकं करूं नकोस. विस्तवाशीं आणि प्रेमाशीं खेळ खेळूं नयेत, ते अंगाशीं येतात, आणि कित्येक वेळां भाजून काढतात !

**अमृत** –विभा, चंद्रिकेवर माझं ज्या प्रकारचं प्रेम आहे तसं प्रेम दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीवर जडणं शक्यच नाहीं. पण तिच्या भावी सुखाकरितां मला अविवाहितच राहिलं पाहिजे. आणि तिनं माझा नाद सोडावा म्हणून विजयेवर प्रेम करण्याचं सोंग मला केलंच पाहिजे. आणि तूं–या नाटकांतल्या नायकाचा मित्र म्हणून मदत केली पाहिजेस. विजयेवर किंवा तिच्या पैशा-वर माझी मुळींच नजर नाहीं—तिचं सालंकृत कन्यादान उद्धवरावांनीं तुला करावं अशीच माझी इच्छा आहे.

**विभाकर** —उद्धवराव तिचं कन्यादान पुष्कळ करतील, पण विजया ही कन्या नवमतवादी, स्वतंत्र वृत्तीची, आहे.

**अमृत** —अरे, समजला तिचा नवमतवाद! तूं तिला अर्धअधिक जिकलं आहेस हें मला ठाऊक नाहीं काय?

**विभाकर** —तिनें मला जिकलं आहे म्हण! पण ती अद्याप आपल्या मनाचा पत्ता लागूं देत नाहीं. समुद्राच्या तळांतलें मोत्यें कुठें कसं आहे हें एक वेळ सांगतां येईल, पण स्त्रियांच्या हृदयांतील गूढ कुणाला सहसा समजायचं नाहीं.

**अमृत** —डॉ. रोखीवाल्यांना स्त्री-हृदयाची मीमांसा करण्याचा नाद आहे, तसा तुला लागलेला दिसतोयू. पण ही स्त्रीहृदय-मीमांसा पुढें करूं; सध्यां माझ्या हृदयाची मीमांसा ऐक. विभाकर! चंद्रिकेचा असा प्रेमभंग मी सुखानं का करीत आहें? जहागीर जाणार याचं मला कांहींच वाटत नाहीं, पण चंद्रिकेला सोडतांना जिवाचे लचके तोडल्यासारखं होत आहे. विभा! काय करूं मी! मी वेडा होणार वेडा! वेडा! वेडा! (डोळ्यांत अश्रु उभे राहतात.)

**विभाकर** —अरे! असं काय करतोस? तिला स्पष्ट सांग कीं मी आतां दरिद्री होणार, मला तुरुंगांत जावं लागेल, आपलं लग्न होणं इष्ट नाहीं. हें प्रेमाचं कपट कशाला?

**अमृत** —देशभक्तीच्या नादीं लागल्यावर असे प्रसंग माझ्यावर येणार हें तिला कितीदां आणि किती तऱ्हेनं सांगितलं, पण ती ऐकते आहे कुठें? ती म्हणते, कितीहि संकटं आलीं तरी मी त्यांना भीत नाहीं.

**विभाकर** —मग करून टाक लग्न, तिची इतकी तयारी असल्यावर.

**अमृत** —लग्न करूं म्हणतोस ?

**विभाकर** —हो ! ती जर संकटांना तोंड द्यायला तयार आहे, तर काय हरकत आहे ?

**अमृत** —दहा वर्षें तुरुंगात जावं लागणार हे दिसत असतांना ?

**विभाकर** —हो !

**अमृत** —हो ! (हेल काढून) हो काय ? काय, मनुष्य आहेस का कोण आहेस तूं ? जाणून बुजून तिला हालांच्या खाईत ढकलूं ? कधीं नाहीं हें पाप करणार. मी आपले पाहिजे तेवढे हाल करून घेईन, नाचक्की करून घेईन, पण तिला सौभाग्यांतलं वैधव्य अनुभवायला लावणार नाहीं. हें फूल आपल्या हातांनीं आगींत फेकून देण्यापेक्षां मी स्वतः आगींत उडी घेईन. समिधा होमांत वाहायच्या असतात आणि फुलं देवाच्या पायांवर वाहायचीं असतात. देशभक्तीच्या होमांत स्वतःच्या सुखासाठीं मी तिची आहुति देऊं ? चांगलं सांगतो आहेस !

**विभाकर** —तुझं मन आतां शुद्धीवर नाहीं, विकृत झालं आहे. मला तरी तुझं हें करणं अनेक दृष्टींनीं पसंत नाहीं. पहा बुवा !

**अमृत** —अरे ! विजयेवर खोटं प्रेम दाखविल्याशिवाय तिला माझा तिटकारा यावयाचा नाहीं. तिला माझं नांव उच्चारल्याबरोबर ओकारी यावी असं जेव्हां मी कांहीं तरी आचरण करीन, तेव्हांच ती माझा नाद सोडील, नाहीं तर जन्मभर झुरत राहील, म्हणून हें दुष्टपणाचं सोंग घ्यायचं.

(इतक्यांत **चंद्रिका** व **विजया** येतांना दिसतात. ते बोलणें बंद करतात. त्या दोघी प्रवेश करतात.)

**विजया** —आम्ही दिसल्यावर मित्रांची वाचा कां बंद झाली ? आणि दोघांची अशी चोरट्यासारखी दृष्टि कां दिसत आहे ? कांहीं कट-बीट केला आहे काय ?

**अमृत** —हो ! चंद्रिकेचा सत्यनाश करण्याचा. (स्वर बदलून) अहो ! कसला कट नि कसलं काय ? तुमच्यासारख्या व्यक्ति दिसल्यावर असल्या रूक्ष मित्राशीं कोण बोलत बसेल ? कोकिला दिसल्यावर कावळ्याकडे कोण लक्ष देईल ?

**विजया** --( विभाकराकडे पाहून ) दुसरा कावळा! पण काय हो, विभाकरपंत केव्हांपासून तुम्हांला कावळ्यासारखे वाटूं लागले?

**अमृत** --तुम्ही कोकिळा वाटूं लागल्यात तेव्हांपासून.

**विजया** --अमृतराव, ही कवींची भाषा वेड्या कवींना एक वेळ शोभेल, तुम्हांला नाहीं शोभत. ( मनांत ) चांगली आहे कोटि: कोटि करण्याकरितांच मला 'कोकिळा' म्हटलं हें मला समजतं, पण तरी देखील मनाला बरं वाटतं!

**अमृत** --नळाच्या अंगांत जसा कलीनें प्रवेश केला होता तसा माझ्या अंगांत आतां कवीनें प्रवेश केला आहे आणि म्हणून मी म्हणतों, कीं निशिगंधाचं फूल दिसल्यावर जाईच्या फुलाकडे कोण वळेल?

**विजया** --पण निशिगंधाच्या आसपास डोंगळे हिंडत असतात, आणि भुंगे भ्रमण करीत असतात; त्यांतला एखादा चावेल बरं का? अमृतराव, तुमच्यावर संकटाचा वज्राधात झाल्यामुळें तुमच्या मनाचा तोल गेलेला आहे. या चंद्रिकेला काय सांगायचं तें सांगितलं आहे मीं. तिच्याशीं स्वस्थपणानं बोलावं. डोक्यांत राख घालून घेऊं नका. मी आतां या भ्रमराबरोबर-- ( तुमच्याप्रमाणें माझ्याहि अंगांत कवि शिरला आहे! )--या भ्रमराबरोबर मला कांहीं महत्त्वाचं बोलायचं आहे, म्हणून त्याला बाजूला घेऊन जातें-लवकर येतें परत. ( विभाकराला चलण्याबद्दल खूण करते. )

**विभाकर** --ही माझी कुचेष्टा आहे, खऱ्या प्रेमाची ही लाडीक थट्टा नव्हे, हें मी ओळखून आहें; तरी मी येतों तुझ्याबरोबर. आज्ञा आहे ना! यमाच्या पाशांतून एक वेळ सुटेल पण आशेच्या पाशांतून सुटणें कठीण! अमृतराव जाऊन येतों. [ जातात.

**चंद्रिका**-- काय बोलावं हेंच मला समजत नाहीं. पण राहवत नाहीं म्हणून सांगत्यें, नसत्या काळज्या आणि चिंता उराशीं बाळगून भलते विचार मनांत येऊं देऊं नयेत. स्वस्थ झोंप घ्यावी. मी उद्यां येऊन भेटेन; का आपणच माझ्याकडे याल?

**अमृत** --मी नाहीं येऊं शकणार आणि तूंहि येऊं नकोस. उद्यां नको आणि पुढें केव्हांहि येऊं नकोस. आतां शेवटचा निरोप घे.

**चंद्रिका**—बरं, शेवटचा निरोप घेतें हो! कांहीं तरी बोलायचं आणि कांहीं तरी करायचं. हा स्वभाव जाणार तरी केव्हां?

**अमृत**—तुझा आणि माझा संबंध कायमचा तुटेल तेव्हां! (सुस्कारा सोडून) चंद्रिके, शेवटचे चार शब्द सांगतों ते ऐकून घे आणि मग जा.

**चंद्रिका**—काय होत आहे आज? डोकं का दुखत आहे?

**अमृत**—शरीर स्वस्थ आहे, मनांत काय आहे हें सांगतां येत नाहीं.

**चंद्रिका**—नकोच सांगायला. बोलण्याचा आतां त्रास होईल जीवाला! म्हणून मी आतां कांहीं विचारीतहि नाहीं; आणि तुम्ही सांगूंहि नका. स्वस्थ पडा—

**अमृत**—(गहिंवरून) चंद्रिके, मी तुझा सर्वस्वीं अपराधी आहें. माझं डोकं दुखत नाहीं, डोकं बिघडलं आहे. मला क्षमा कर. (मनांत) पण हा मऊपणा उपयोगी नाहीं. मना, कठोर हो! पाषाणाहून कठोर हो! (उघड) चंद्रिके, माझी जहागीर जाणार आहे.

**चंद्रिका**—जहागीर जाणार म्हणून का इतकं वाईट वाटून घ्यायचं? जहागीर गेली तरी मी आहे ना! जहागिरीपेक्षां हजार पटीनें माझी किंमत अधिक आहे म्हणून कितीदां तरी आपल्या तोंडून ऐकलं आहे.

**अमृत**— पण तुला दारिद्र्याचे हाल—

**चंद्रिका**— आम्ही बायका दारिद्र्याला भितों असं का वाटतं आपल्याला? आम्हांला पतीचं प्रेम असलं म्हणजे त्यांत सगळं कांहीं आलं.

**अमृत**— पण राजद्रोहाबद्दल खटला होणार आहे, आठ-दहा वर्षं कैदेंत जावं लागेल—

**चंद्रिका**— तुम्हांला आधीं शिक्षा व्हायचीच नाहीं, कारण सरकार इतकं अन्यायी आहे असं मला वाटत नाहीं आणि कदाचित् शिक्षा झाली तरी माझी सगळी पुण्याई खर्च करून तुम्हीं हातीं घेतलेलं कार्य मला जमेल तेवढं पुढं चालवीन मी. आपली शिक्षकिणीची स्वतंत्र नोकरी सोडून आपल्याकडे पत्नी म्हणून यायचं कबूल केलं, ते ऐष-आराम आणि प्रेमलीला यांहून कांहीं उच्च ध्येय मला होतं म्हणूनच ना?

**अमृत**— सगळं खरं, पण—

**चंद्रिका**— या गोष्टी बोलूं नयेत पण बोलतें. तुमच्या जहागिरीनं माझं मन

तुमच्याकडे ओढलं गेलं नाहीं, जहागिरदाराबद्दल माझं मन प्रथम कलुषितच होतं, पण लहानपणापासून मला अनुभव येऊं लागला होता कीं, तुमच्या संगतींत मी असलें म्हणजे माझं मन आनंदांत असायचं, तुमच्या संगतींत माझ्या ज्ञानामध्यें भर पडे, माझं मन पवित्र होई, माझ्या भावना उदात्त होत. या अनुभवांनींच माझं मन अंकित झालं, जहागिरीनं नाहीं.

**अमृत**— माझ्या संगतीचा हा गुण नव्हता; उलट तुझ्या संगतीनं मात्र माझा उतावळेपणा आणि मूर्खपणा कमी झाला आहे.

**चंद्रिका** —आहे, थोडंसं खरं आहे हें. तुमचं मन थोर आहे. उदार आहे. पण तुमचा स्वभाव फार उतावळा आणि हट्टी आहे. तो माझ्या वारंवार बोलण्यामुळें थोडासा कमी झाला आहे खरा. पण अजून तो बराच निवळायचा आहे. तो निवळला नाहीं तर तुमचा सगळा थोरपणा आणि उदारपणा, तुमचा देशाभिमान आणि स्वार्थत्याग, फुकट जाईल ही मला भीति वाटायची. आणि माझी तशी योग्यता नसली, तरी तुमचं या दोषांपासून रक्षण करणं हें माझं कर्तव्य आहे असं मला आपलं वाटायचं, ( आणि खरं सांगूं का ? मी आपली प्रौढी सांगत नाहीं पण प्रसंग आला म्हणून बोलतें ) आपला उतावळा आणि हट्टी स्वभाव जरासा आवरून धरून आपल्या थोर गुणांचं चीज झालेलं पहावं हा आपल्याशीं लग्न करण्याचं वचन दिलं त्या वेळेस माझ्या मनांत विचार होता.

**अमृत** —चंद्रिके तूं साध्वी आहेस ! पण ( डोळ्यांत अश्रु येतात. दुसरीकडे पहातो. डोळ्यांवर हात ठेवतो. ( मनांत ) मनाचा हा मऊपणा सोडलाच पाहिजे. मना, पुन्हा एकदां जोर कर ! आणि या माया-पाशांतून मोकळा हो.)

**चंद्रिका** —तिकडे काय पहायचं ? आणि डोळ्यांत अश्रु कां ?

**अमृत** —( निश्चयी स्वरांत ) तुझ्यावर आतां प्रेम उरलं नाहीं म्हणून. खरं प्रेम नसून इतके दिवस प्रेमाचं नाटक चालू ठेवलं पण तें आतां विसरलं पाहिजे. माझं मन विजयेकडे ओढ घेत आहे. तिनें नाहीं म्हटलं तर दुसरीशीं लग्न करीन. अलीकडे मला तूं अगदीं मिळमिळीत—नादान मुलगी वाटूं लागली आहेस. विजया कशी चुणचुणीत मुलगी आहे पहा ! तुझीं मतं अगदींच भित्रेपणाचीं आणि जुनींपुराणीं आहेत. तिचीं कशीं धीटपणाचीं आणि नवीन नवीन आहेत. जुन्या कल्पनांचीं जुनेरीं नेसणारी तुझी बुरणुसलेली

बुद्धि कुणीकडे आणि नव्या नव्या मतांचीं रंगीबेरंगी पातळं नेसणारी तिची तेजस्वी बुद्धि कुठें ! ( चंद्रिका रडूं लागते. )

**अमृत** —( कपाळाला हात लावून ) अग रडूं नकोस.

( तो तिच्या जवळ जातो, इतक्यांत **विजया** व **विभाकर** येतात; येतांना किंचित् संकोचतात ). या, संकोच करण्याचं कारण नाहीं. ( निश्चयाचे स्वरांत ) अहो ! हिच्या संगतींत रडारडीच. तुम्ही आलांत हें चांगलं झालं. अमावास्येची रात्र संपतांना उषा आणि अरुण यावेत त्याप्रमाणं तुमचं येणं झालं. या. विभाकर, हे घे पेढे. तूं अजून कांहीं खाल्लेलं नाहींस. विजये, तूं पण कांहीं तरी घे.

**विजया** —कांहीं नको !

**अमृत** —तुला संत्रीं आवडतात; संत्रीं आणवतों. कोण आहे रे तिकडे ? नर्मदा, अंगार, ( **अंगार** येतो त्याला ) संत्रीं आण पाहूं दोन-चार. आधींच कां ठेवलीं नाहींस ? ( अंगार संत्रीं घेऊन येतो. तीं फोडतो व विजयेस देऊं लागतो. ) अंगार, आपली पायरी ओळखून असावं माणसानं—चंद्रिके, तूं आतां जा. विभाकर तुला घरीं पोंचवील.

**विभाकर** —तूं कां जात नाहींस नेहमींसारखा ?

**अमृत** —मी आतां नेहमींसारखा राहिलों नाहीं म्हणून. माझा आणि तिचा आतां पूर्वींचा संबंध राहिला नाहीं म्हणून.

**विभाकर** —किती छळणार तूं हिला ? तुला कांहीं दयामाया नाहीं का ? मित्र म्हणून तुला सांगतों.

**अमृत** —चूप ! मित्रबित्र कांहीं जाणत नाहीं आत्तां. चंद्रिके, जा तूं आतां. ( विभाकर मधेंच बोलूं पाहतो ) कांहीं बोलायचं नाहीं. विजये, हिच्या रडण्याकडे मुळींच लक्ष देऊं नकोस. तिला दुःख होणं साहजिकच आहे, पण त्याला इलाज नाहीं. प्रेम नाहींसं झाल्यावर प्रेमाचं नाटक कशाला ? राज्य गेल्यावर छत्र धारण करायचं किंवा नवरा मेल्यावर कुंकू लावण्याचा हट्ट धरायचा, असला प्रकार पाहिजे कशाला ? स्वतःची आणि लोकांची फसवणूक करून फायदा काय ? त्यांत कांहीं अर्थ नाहीं; वरकरणी भाषणाच्या साखरेनं कठोर सत्याचा कडवटपणा नाहींसा होत नाहीं; उलट तो अधिक वाढतो. विभाकर ! तूं चंद्रिकेला पोंचव. मी विजयेला उद्धवरावांकडे पोंचवतों.

**विभाकर** —मी नाहीं जात. तूंच—

**अंगार** —मी जातों पाहिजे तर ?

**अमृत** —गप्प बस ! असला लघळपणा पुन्हा केलास तर धक्के मारून घालवून देईन. मूर्ख शिंचा.

( **उद्धवराव, सावित्रीबाई,** आणि **चक्रधर** प्रवेश करतात. )

**उद्धवराव** —विजू, इतका उशीर झाला तरी आली नाहींस म्हणून मोटार घेऊन तुझा शोध काढीत आलों. आम्हांला कळवायचं तर खरं ?

**विजया** —बाबा, संध्याकाळीं क्लबांत यांची चिठ्ठी आली होती कीं, अवश्य अवश्य इकडे आलं पाहिजे, महत्त्वाचं काम आहे. म्हणून परस्पर इकडे आल्यें. घरीं निरोप पोंचवायला क्लबांत कोणी मनुष्य मिळाला नाहीं.

**उद्धव** —चांगलं !

**विजया** —मी इथं आहें म्हणून कुणी सांगितलं ?

**चक्रधर** —चुकला फकीर मशिदींत सांपडायचा तशी तूं ह्या वाड्यांत, नाहीं तर विभाकरपंतांकडे सांपडायचीस हें ठरलेलं आहे.

**विजया** —तूंहि चुकलेला फकीर होऊन चंद्रिकेकडे कधीं कधीं सांपडतोस.

**सावित्री** —विजू, पण घरीं कळवल्याशिवाय असं रात्रीं घराबाहेर—

**विजया** —मी कांहीं भलत्या-सलत्याकडे गेलें नव्हतें.

**चक्रधर** —विजूताई, हे भलते नसले तरी सरकारच्या डोळ्यांत हल्लीं सलते आहेत हें ठाऊक आहे ना ? हे सरकारविरुद्ध भांडणारे आणि बाबा-साहेब सरकारच्या बाजूचे; यांचं आणि आपलं सूत जुळायचं कसं ? अग ! बाबासाहेबांना 'सर' पदवी मिळायची आहे म्हणतात. ती तुझ्या माझ्या वागण्यानं मिळायची नाहीं एखादे वेळेस ! त्यांना यांच्यासारख्याशीं फार संबंध ठेवतां येणार नाहीं. शिवाय हे अविवाहित ! यांचं लग्न——

**सावित्री** —चंद्रिकेशीं होणार आहे ना ? काय ग चंद्रे, खरं ना ? काय अमृतराव– ( अमृतराव तोंड फिरवतो. उत्तरें देण्याचें टाळतो.)

**उद्धव** —कां, तोंड कां फिरवलं ? कांहीं विघ्न उत्पन्न झालं आहे वाटतं ?

**अमृत** —उत्पन्न झालं नाहीं, मींच उत्पन्न केलं आहे. मला चंद्रिकेशीं लग्न करावंसं वाटत होतं, पण आतां माझं मन बदलत चाललं आहे.

**उद्धव** --बदलत चाललं आहे ? म्हणजे दुसरीकडे कुठें जातं आहे, असंच ना ? कोण ती भाग्यवान् स्त्री ?

**चंद्रिका** --इथंच आहे ती !

**उद्धव** --इथंच आहे !

**सावित्री** --म्हणजे ! आहे काय प्रकरण ! काय ग विजये--

**विजया** --माझा यांत कांहीं संबंध नाहीं.

**चंद्रिका** --आज नसेल, उद्यां येईल !

**उद्धव** --अस्सं. हें प्रकरण चमत्कारिक दिसतंय् ( एकीकडे ) बाकी विजयेशीं अमृतरावांचं लग्न जुळलं तर वाईट नाहीं !

**चक्रधर** --चंद्रिके, आज वाङ्निश्चय व्हायचा होता ना ?

**चंद्रिका** --व्हायचा होता ! पण--

**चक्रधर** --( एकीकडे ) हा वाङ्निश्चय मोडला असला तर आपल्याला आशा आहे !

**उद्धव** --विजये, तूं का चंद्रिकेच्या लग्नांत बिब्बा घातलास ?

**विजया** --मी मुळींच नाहीं. माझं यांच्यावर तशा प्रकारचं प्रेम अद्याप-पर्यंत तरी नाहीं !

**उद्धव** --'अद्यापपर्यंत' म्हणतेस त्याच्यावरून कांहीं तरी पाणी मुरतं आहे असं दिसतंय्.

**अमृत** --हीं बोलणीं आतां राहूं द्या.

**अमृत** --( आलेल्या मंडळीस ) कांहीं पेढे संत्रीं--

**उद्धव** --नको. थँक्स, मला आतां घाई आहे. दहा वाजतां कलेक्टरनं बोलावलं आहे कांहीं कामाला. जातों आतां मी.

**चक्रधर** --आम्हांला पेढे द्या बोवा, आम्ही तसे नाहीं जाणार.

**अमृत** --अवश्य. हे घ्या. ( अंगारकडे वळून ) अंगार हें सगळं फराळाचं सामान पेढे, बर्फी, चिवडा, फळं काय उरलं असेल तें सगळं उद्यां गरिबांना वाटून टाक. नाहीं तर असं कर. रात्रीं दहा वाजतां भिक्या आंधळा येतो ना, त्याला थोडंसं दे आणि त्याच्यामागून येणाऱ्या फाकिराला देऊन टाक बाकीचं. घरदार जायचं आहे लवकरच. तें आहे तोंपर्यंत उपकार करतां येईल. तेवढा करून घ्यावा.

**अंगार** —पेढे, बर्फी ठेवून घेतों; उपयोगी पडतील.

**अमृत** —तें कांहीं नाहीं. मी सांगतों तसं झालंच पाहिजे. आपली अक्कल खर्च करूं नकोस. जहागीर जाणार आहे त्याची पर्वा नाहीं; तर या पेढ्या-बर्फीची काय मातब्बरी? खाऊं दे गरीब बिचाऱ्यांना जन्मांतून एक दिवस तरी पोटभर मिठाई! आणि अंगार, त्या नर्मदेशीं तूं फार लघळपणा करतोस तो मला चालायचा नाहीं हां. ध्यानांत धर.

**अंगार** —माझा आपल्याला संशय येतो? अमृतराव—

**अमृतराव**—कांहीं बोलूं नकोस; जा. आणि हें बघ, अंगार, त्या आंधळ्याला इथं निजायचं असलं तर निजूं दे पडवींत. परवां रात्रीं गांवाहून मी आलों तेव्हां अंगणांत कुडकुडत निजलेला दिसला तो. त्याला पडवींत कां निजूं देत नाहींस?

**अंगार** —तो अस्पृश्य आहे, त्याला पडवीत कसं निजूं द्यायचं?

**अमृत** —काय मूर्ख आहे पहा! मला उपदेश करतो आहे! मी सांगेन तसंच झालं पाहिजे. आई होती तेव्हां देखील तिचं मन असल्या बाबतींत मीं दुखवलं, पण तत्त्व सोडलं नाहीं. माझा एकदां निश्चय ठरला म्हणजे ठरला. माझा वाडा विटाळला तरी हरकत नाहीं. माझ्या वाड्यांत--

( पोलीस ऑफिसर-शिपाई येतात. )

**पोलीस ऑफिसर** —हा आतां आपला नाहीं वाडा; सरकारांत जप्त झाला आहे. ताब्यांत घ्यायला आलों आहों आम्ही. त्याच्याआधीं पंचांसमक्ष झडती घेऊन पिस्तुलं सांपडत आहेत का हें पाहयचं आहे. दुपारीं आलों असतों तर तमाशा दिसला असता म्हणून या वेळेला ताबा घेण्याबद्दल वरून लिहून आलं आहे. आपणाला एक महिनाभर इथं राहतां येईल. पुढें दुसरीकडे व्यवस्था केली पाहिजे.

**अमृत** —राजद्रोहाच्या खटल्यांत शिक्षा झाली तर सरकारचा पाहुणा होईन आणि मग राहण्याची व्यवस्था आपोआपच होईल!

**— अंक पहिला समाप्त. —**

# अंक दुसरा



[ **स्थळ**–उद्धवराव यांच्या बंगल्यांतील दिवाणखाना नवीन पद्धतीनें सुसज्जित केलेला आहे. **उद्धवरावना** '**सर**' पदवी मिळाल्याबद्दल घरगुती छोटी मेजवानी आहे असा प्रसंग. **अंगार** सामान-सुमानाची मांडामांडी करीत आहे.]

**अंगार**—बाबासाहेबांना 'सर' पदवी मिळाली म्हणून आमचे नवे मालक विभाकरपंत, जुने मालक अमृतराव, आणि चंद्रिका यांना मेजवानी देत आहेत. आम्हांला बोलावणं आहे, पण ऐटींत खुर्चीवर बसून मोठ्या लोकांच्या पंगतींत खाना खाण्याचं आमच्या नशिबांत आहे कुठें ? आम्हां कारकुनांना बोलवायचं म्हणजे हरकामाला उपयोगी पडावं म्हणून. 'मालकांना मान आणि कारकुनांना काम' अशी जगाची रीतच आहे. अमृतरावांच्या वडिलांनीं सावकारींत आमची इस्टेट गिळंकृत केली नसती, तर आज अशा स्थितींत कशाला आलों असतों ? ( पदाचा चरण गुणगुणतो ).

**अंगार**—अरे कुठार, तूं कशाला आलास इथं धडपडायला ?

**कुठार**—दोस्त ! चार-पांच रुपये दिलेस तर काम उत्तम होईल, एवढी सोय झाली पाहिजे.

**अंगार**—( इकडे तिकडे पाहून ) हे घे दोन रुपये जा. काम फत्ते झालं पाहिजे हां !

**कुठार**— तें माझ्याकडे लागलं. [ जातो.

**अंगार**—नर्मदेचं काम अंगास येणार असं दिसतंय्. ती तर अलीकडे चिथरलेली दिसते. (पाहून) तीच येत आहे वाटतं इकडे.

( **नर्मदा प्रवेश करते.**)

**नर्मदा**—( अंगारला ) तुम्ही आहांतच का इथं ?

**अंगार**—अग, तूं आहेस तिथं मी असायचाच !

**नर्मदा**—मला आईसाहेबांनीं फराळाला बोलावलं आहे.

**अंगार**—मग इकडे कशाला आलीस ?

**नर्मदा**—आईसाहेबांनीं मांडामांड झाली कीं नाहीं हें पाहायला पाठविलं आहे ! कुठंहि गेलं तरी कामाचा समंध सुटत नाहीं.

**अंगार**—आणि मीहि तुझ्या पाठीमागचा समंध आहेच ! लाडके नर्मदे—

**नर्मदा**—हलकटपणा झाला तेवढा पुरे नाहीं का झाला ? मला तुमचं दर्शन नकोसं झालं आहे.

**अंगार**—अपमान करीत आहेस—विस्तवाशीं खेळत आहेस ! त्या अमृत्यानें आणि विभाकरानें अनेकदां अपमान केले आहेत त्याबद्दल त्यांचा जसा सूड घेणार आहें—

**नर्मदा**—त्यांनीं तुमच्यावर उपकार केले म्हणून त्यांना तुम्ही अमृत्या आणि विभाकऱ्या म्हणतां वाटतं ? आणि म्हणून त्यांचा सूड घेणार तुम्ही ? काय सूंड घेणाऱ्याचं तोंड ? कसा हो सूड घेणार ?

**अंगार**—कसा ? अग, मनांत आणलं तर सरकारकडून सूड उगवीन !

**नर्मदा**—सरकारांत आपलं फार वजन ! कसं हो वजन मिळवलंत एवढं !

**अंगार**—कसं आणि काय ? मी डिटेक्टिव्ह—( जीभ चाऊन ) डिटेक्टिव्ह लोकांत माझं वजन आहे. त्यांच्याकडून सूड उगवून घेईन.

**नर्मदा**—चांगलं ! दोघांनीं तुम्हांला आश्रय दिला त्याची ही फेड !

**अंगार**—आश्रय दिला ? त्या अमृत्याच्या बापानं सावकारींत बदमाषी करून माझी इस्टेट गिळंकृत केली; आणि त्याच्या या लेकानं मला आश्रय देऊन पाप धुऊन काढण्याचा प्रयत्न केला, दुसरं काय ? त्याला मीं क्षमा केली असती; पण चंद्रिकेशीं आणि विजयेशीं मी बोलतों चालतों म्हणून हा लेकाचा मला शिष्टपणाच्या गोष्टी सांगतो आणि दम देतो. आमचे नवे मालक विभाकरपंतहि असा पोक्तपणाचा आव आणून आम्हांला उपदेश करतात. यांच्या प्रेमाचे खेळ आम्हांला ठाऊक नाहींत होय ?

**नर्मदा**—काय प्रेमाचे खेळ आहेत हो त्यांचे ? भलत्याला भलतीं नांवं ठेवलेलीं मला नाहीं खपायचीं !

**अंगार**—अमृतराव चंद्रिकेला लग्नाची आशा लावून पुन्हा आपला विजयेवर नजर ठेवतोच आहे, हें आम्हांला दिसत नाहीं होय ? आणि विभाकरपंतहि विजयेकडे मधून मधून जात येत असतो तें उगीच होय ! आम्हांला काय यांचीं लफडीं समजत नाहींत असं वाटतं ?

**नर्मदा** —लफडीं !

**अंगार** –बडे लोक पोरींच्या पाठीमागं लागले म्हणजे त्यांना 'प्रीति', 'प्रेम', 'प्रेमलीला' म्हणायचं आणि आम्हीं गरिबांनीं तेंच केलं म्हणजे आमचीं मात्र लफडीं आणि पापं ठरतात असा जगाचा न्याय आहे ! समाजांत नीतीच्या कल्पना श्रीमंतांनीं आपल्या सोयीच्या करून घेतल्या आहेत, असा विजयेचा नवमतवाद आहे ना ? तोच मला खरा वाटतो. अग, हे बडे बापके बेटे, एकेक जे गुण उधळीत असतात ते तुला ठाऊक नाहींत; सांगूं का एक एक ?

**नर्मदा** —कांहीं नकोत सांगायला ! तुमचे गुण मला ठाऊक झाले आहेत तेवढे पुरे झाले ! आणि ते लोकांनाहि कळण्यासारखे झाले आहेत. बायकाच्या ओठांवरच्या पुष्कळ गोष्टी ओठांतच ठेवतां येतील पण इतर गोष्टी मोठया चुगलखोर असतात ना ? माझ्या हें वेळीं ध्यानांत आलं असतं तर फसलें नसतें—तुमच्याशीं संबंध ठेवला नसता—

**अंगार** —जाऊं दे झालं ! क्षमा कर—

**नर्मदा** —क्षमा न करून सांगतें कुणाला ? क्षमा करतें इतकंच नाहीं तर तुमच्याशीं लग्नहि करायला तयार आहें.

**अंगार** —अं ?

**नर्मदा** —मनांत नसलं तरी जनलज्जेकरितां आतां केलंच पाहिजे; करता काय ? तुम्ही गुण उधळले आहेत आणि आतां त्याकडे लक्षच देत नाहीं ! पण लोकांच्या ते नजरेस येऊं लागले आहेत म्हटलं !

**अंगार** —म्हटलं माझेच कशावरून हे गुण ? विभाकरपंतांचे कशावरून नाहींत ? अमृतरावांचे तरी कशावरून नाहींत ?

**नर्मदा** —चांडाळा—बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अडली गाय नि फटके खाय, तशांतली माझी गत झाली आहे.

**अंगार** —अग, पोर होईल तें संभाळ ! त्याला मी पैसे देईन. सगळं करीन. भितेस काय ? लग्न करून अधिक काय होणार आहे ? प्रेम असलं म्हणजे झालं, असं विजया म्हणते तेंच खरं ! विवाहसंस्था बलवानांनीं आणि श्रीमंतांनीं आपल्या सुखसोयीकरितां केलेली आहे, दुसरं काय ? विवाहसंस्थेविरुद्ध बंडखोरी केलीच पाहिजे. गरिबांतले नेभळट लोक असतात तेच नीति-अनीतीच्या बागुलबुवाला भितात. मनांत प्रेम असल्यावर बोहल्यावर

बसण्याचा आणि डोक्यावर अक्षता उधळून घेण्याचा खुळचट विधि पाहिजेच कशाला? या विधीविरुद्ध बंड करण्यांतच खरं शौर्य आहे असं विजया नुसती म्हणते; आपण तसं करून दाखवूं या. खरं शौर्य—

**नर्मदा** —आपण फार शूर आहांत, कबूल आहे मला. आपलं शौर्य, धैर्य, आमच्यासारख्या बायकांच्यापुढंच--

**अंगार** —अग, देशाकरितां मीं लाठीमार सोसला आहे; काय समजतेस?

**नर्मदा** —चुकून सापडलांत म्हणून सोसावा लागला; अमृतरावांसारखे मुद्दाम गेले नव्हतेत.

**अंगार** —अमृतरावांच्या गोष्टी मला सांगतेस? त्यांच्या गुणामुळंच त्यांची जहागीर गेली. अग, राजद्रोही भाषणं ते करतात, इतकंच नाहीं तर (इकडे तिकडे पाहून) पिस्तुलं त्यांनीं लपवून ठेवलीं आहेत अशी सरकारला बातमी लागली आहे.

**नर्मदा** —सरकारला कळलं हें तुम्हांला कसं कळलं?

**अंगार** —अग, कसं! मीच-(जीभ चावून) मीच म्हणतों असं नाहीं. माझा दोस्त कुठार असंच म्हणत होता. अमृतरावांसारखा पिस्तुलं लपविणारा राजद्रोही मी नाहीं. समजलीस? मी आपला सरळ साधा मनुष्य आहे.

**नर्मदा** —अमृतरावांशीं कशाला तुलना करून घेतां? ते कुठें आणि तुम्हीं कुठें? इंद्राचा ऐरावत कुठें—

**अंगार** —(स्वतःकडे बोट दाखवून) हा इथें; (नर्मदेकडे बोट दाखवून) आणि शामभटाची तट्टाणी ही इथें.

**नर्मदा** —मी तट्टाणी झालें आणि तुम्ही या कोटींतील शामभट ठरलेत हें ध्यानांत कुठें येतंय्? असली कोटि करून का कुठं अमृतरावांची सर येते? ते कुठें आणि—

**अंगार** —ते आपल्या घरीं इकडे येण्यासाठीं कपडे घालीत असतील आणि मी, सर उद्धवराव बॅरोनेट, यांच्या दिवाणखान्यांत मेजवानीची मांडामांडी करत आहे. पण काय ग, चक्रधर कुठें दिसत नाहीं? चंद्रिकेला आणायला मोटार घेऊन गेला असेल, दुसरं काय?

**नर्मदा** —तुम्हांला कशाला या नसत्या उठाठेवी हव्यात? म्हणतात ना,

'कारकुनाची स्वारी आणि उठाठेवी भारी!' चंदूताईवरहि तुमची नजर आहे वाटतं? माझ्यासारखं तिलाहि गोत्यांत आणण्याचा बेत दिसतोय्! पण मी—

**अंगार**—चूप! ते पहा! बाबासाहेब येताहेत—

(सर **उद्धवराव** प्रवेश करतात.)

**उद्धवराव**—काय अंगार, नर्मदा, तुम्हांला फराळाला बोलावलं–तुम्ही कशाला कामाला लागलेत? आहेत घरचीं माणसं—

**अंगार**—त्यांना आईसाहेबांनीं बाहेर धाडलं आहे कांहीं कामाला. आम्हीं काम केलं म्हणून काय झालं? मला तर काम केल्याशिवाय चैनच पडत नाहीं. आणि हें परक्याचं कां घर आहे?

**नर्मदा**—कामानं आम्ही झिजतों कीं काय? आपल्याकडचं काम केलंच पाहिजे.

**उद्धव**—बरं, झाली ठीक मांडामांड? आतां स्वयंपाकघरांत काय व्यवस्था पहा जा आणि विजूला इकडं पाठवून द्या. (घड्याळाकडे पाहून) अजून थोडा अवकाश आहे मंडळी यायला. जरा इकडे बोलावलं आहे म्हणावं. (अंगार, नर्मदा जातात.) 'सर' पदवी मिळाली म्हणून लोकांना वाटत असेल कीं मी आनंदांत आहे; पण या विजूची काळजी किती जाचीत आहे याची लोकांना काय जाणीव? तरुणांशीं फार मोकळेपणानं वागते हें आपल्याला पसंत नाहीं. बरं, कोणाशीं तरी आपलं लग्न जुळवावं तर तेंहि करीत नाहीं ती! ती चंद्रिका अशीच. अमृतरावाशीं लग्न जुळत नाहीं, तर आमच्या चक्रधराशीं कर म्हणून म्हटलं, तर त्यालाहि ती कबूल नाहीं! या तरुण-तरुणींचीं मनं काय आहेत हें अलीकडे कळेनासं झालं आहे आपल्याला. त्यांतून आमच्या विजयेचं तर मला कांहींच कळत नाहीं. (विजया प्रवेश करते. तिचा तऱ्हेदार पुरुषी पोषाख असतो तें पाहून) अं? आज तऱ्हेदार साहेबी पोषाख करण्याची लहर आली वाटतं. घे जीवाचं कौतुक करून!

**विजया**—बाबा, या वयांत तऱ्हेदार पोषाकाची हौस पुरवून घ्यायची नाहीं, तर केव्हां?

**उद्धव**—घ्या हौस पुरवून. आम्ही कुठें नाहीं म्हणतों? आम्हांला चमत्कारिक वाटतं ही गोष्ट खरी! पोषाखाचं एक वेळ राहूं दे; पण तुझं तें

नवमतवादी बोलणं-चालणं आणि वागणं-सवरणं आपल्याला नाहीं पसंत. आणि त्याविषयींच मी आतां बोलणार आहें.

**विजया**--'सर' पदवी मिळाल्याबद्दल मला एखादी सुंदर वस्तु नजर करण्याऐवजीं नीति-अनीतीवर व्याख्यान देणार वाटतं आज ?

**उद्धव**-- हो. तसंच करणार आहे. विषय लांबणीवर टाकण्यासारखा मला वाटत नाहीं म्हणून आज उपदेशवजा व्याख्यान देणार आहे ! विजू, इतके दिवस तुझे लाड केले, एकहि कठोर शब्द बोललों नाहीं, कोणाला बोलूं दिला नाहीं, शिक्षण दिलं, स्वातंत्र्य दिलं, तुझीं नवमतवादी बोलणीं चालूं दिलीं, तुझ्या वागण्याला कांहीं एक पायबंद घातला नाहीं, खरं ना ? तुला मीं फार लाडावून ठेवली आहे, तुझं मी फाजील कौतुक करतों, असं लोक म्हणत; पण मीं तिकडे लक्ष दिलं नाहीं. वाटायचं कीं समंजस मुलगी आहेस–आणि तूं आहेस तशी–

**विजया**--समंजस मुलींना सौम्य शब्दाचा मार समजतो.

**उद्धव**-- तूं समंजस आहेस, पण फाजील स्वातंत्र्य देणं म्हणजे विस्तवाशीं खेळणं आहे असं मला वाटूं लागलं आहे. बायकांना इतकं स्वातंत्र्य देणं बरं नाहीं.

**विजया**-- कां बरं ? कांहीं विलायती फुलझाडांना ऊन्ह, वारा, प्रकाश यांचा स्पर्श होऊं देत नाहींत आणि त्याला सावलीच्या बंदिस्त जागेंत ठेवून देतात तसं आम्हां बायकांना स्वातंत्र्याचं वारं लागूं द्यायचं नाहीं असं आपलं मत झालंय् वाटतं ?

**उद्धव**--स्पष्टच सांगतों– अमृतरावाशीं तुझी अलीकडे फार गट्टी जमूं लागली आहे. तो चांगला आहे, पण छांदिष्ट आणि लहरी आहे. स्वभावाचा दिलदार खरा, पणा दूरवर विचार नाहीं. मनांत जी लहर येईल ती हट्टानं पुरी करणारा. कल्पनेच्या वाऱ्याबरोबर सावरीच्या कापसाप्रमाणं वाहात जाणारा. शिवाय अलीकडे सत्याग्रहांत शिरला आहे. अजून 'भाई'–लोकांत शिरला नाहीं, पण त्यांच्यांत त्याचं जाणंयेणं असतं—

**विजया**--मग त्यांत वाईट काय आहे ?

**उद्धव**--देशाभिमान वाईट नाहीं; पण तो भलत्या थराला गेला आणि आततायीपणाचं त्याला स्वरूप आलं, कीं देशाचा फायदा तर होत नाहींच, उलट तोटा होतो. विस्तवाची माफक उष्णता कामीं येते; पण त्याचा

चटका भाजून काढतो. अमृतरावाच्या ज्वलज्जहाल देशाभिमानानं त्याचा फायदा काय झाला आहे ? आणि देशाचा तरी काय फायदा झाला आहे ?

**विजया** --नफ्यातोट्याच्या तराजूनं प्रेम आणि देशाभिमान या भावनांचं मोल ठरविण्याचं तुमचं तत्त्वज्ञान, बाबा, फार उच्च आहे म्हणायचं ! नफ्यातोट्याची हिशेबी नीतिमत्ता व्यवहाराच्या बाजारपेठेंत चांगली; पण ती ध्येयात्मक नीतीच्या मंदिरांत शोभत नाहीं.

**उद्धव** --शोभत नाहीं, पण बरोबर आहे. ती उच्च नसेल पण यथार्थ आहे. रायवळ आंब्यांचीं झाडं उंच असतात, पण फळं आंबट असतात. हापुस-आंब्यांचं झाड तुझ्या भाषेंत बोलायचं म्हणजे उच्च नसेल; पण त्याचीं फळं रुचकर असतात. अमृतरावांचे हेतु उच्च असतील, पण फळं कशीं आहेत ? स्वतःचं किंवा देशाचं त्यानं काय हित साधलं ? मिठाच्या सत्याग्रहांत त्याचं आणि त्याच्याबरोबरच्या पुष्कळ तरुणांचं टाळकं सडकलं गेलं, एवढा मात्र त्याचा आणि देशाचा फायदा झाला खरा !

**विजया** --राजद्रोहाचा त्यांच्यावर खटला चालला आहे आणि त्यांना जखमा झाल्या आहेत, अशा वेळीं त्यांची कुचेष्टा करणं चांगलं का ?

**उद्धव** --अग ! त्याच्याबद्दल मला सहानुभूति आणि आदर आहे, म्हणून तर त्याच्या अडचणीच्या वेळीं मी त्याला पूर्वी कर्ज दिलं आणि आतांहि थोडंसं दिलं आहे ना ? जामिनावर सोडण्याची खटपट मींच केली आणि जामीन राहून त्याचं वकीलपत्र मींच घेतलं नाहीं का ?

**विजया** --आणि त्यांना शिक्षा होईल म्हणून मघांशी तुम्हीच म्हणालांत. वकिली बचाव चांगला कराल त्यांचा ?

**उद्धव** --अग, कोर्टांत का म्हणणार आहे असं ? तुम्हां ..यकांचं घरचं लुगडं आणि समारंभाला जायचं लुगडं हीं जशीं निराळीं असतात, तसंच वकिलांचं घरचं मत आणि कोर्टांतील मत--हीं वेगवेगळीं असतात. बरं, तें राहूं दे आतां. तुला मुद्दाम बोलावलं अशाकरितां, कीं अमृतरावानं पिस्तुलं लपवून ठेवलीं आहेत अशी खरी-खोटी बातमी पसरली आहे. अशा वहिमी माणसाकडे तुझं जाणं-येणं अलीकडे फार होऊं लागलं आहे हें मला अगदीं पसंत नाहीं. तुला त्याच्याशीं लग्न करायचं असेल तर खुशाल कर. माझा आशीर्वाद आहे. पण माझी पोझिशन संभाळण्याकरितां तुझ्याशीं,

आणि त्यांच्याशीं मला मग बेताबेताचाच संबंध ठेवावा लागेल. आजच्या आज अमृतराव आणि तूं लग्न करायचं का नाहीं तें ठरवा.

**विजया** --आजच्या आज ?

**उद्धव** —हो. आजच्या आज ठरव वाङ्निश्चय; लग्न मागाहून केलं तरी चालेल. आणि हें बघ, विभाकरपंताशीं तूं सलगी करतेस, त्यांच्याशीं लग्न ठरवायचं असेल तर त्यालाहि माझी हरकत नाहीं. पण लग्नच करायचं नसेल तर त्या दोघांशीं तुझं बोलणं-चालणं अजिबात बंद झालं पाहिजे. त्या दोघांनाहि मीं असंच लिहिलं आहे. अलीकडच्या तरुणींबद्दलच्या गोष्टी ऐकून मला तुझ्याबद्दल भीति वाटूं लागली आहे.

**विजया** --भलत्या भीतीला दूर लोटावीं; कवटाळूं नये. अडाणी लोक खोट्या कल्पनेनें भुतंखेतं निर्माण करतात आणि त्यांना कोंबडीं-बकरीं बळी देतात, तसंच शिष्ट म्हातारीं माणसं देखील नसती भीति उत्पन्न करून घेऊन तरुण-तरुणींचा बळी देतात; अशाच म्हाताऱ्यांतले, बाबा, तुम्ही नसाल असं मला वाटत होतं; पण तो भ्रम आज दूर झाला. भीति-भीति म्हणतां, कसली हो भीति ? आमच्या स्नेहाला आणि सलगीला कां एवढं भ्यायचं ?

(पद)

**उद्धव** —कां भ्यायचं ? तूं आतां लहान का आहेस हें न समजायला ? लोक तुमच्याबद्दल काय बोलताहेत हें ठाऊक आहे का ? आणि लोकांनीं तरी कां बोलूं नये ? मला तर लोकांचंच बरोबर दिसतं. अविवाहित तरुण-तरुणींमध्यें इतकी सलगी नसावी. असल्या सलगीचे फार वाईट परिणाम होतात. नर्मदेचं काय झालं आहे ठाऊक आहे ना ?

**विजया** —काय ?

**उद्धव** —दिवस गेले आहेत म्हणे ! पोट—

**विजया** —खरंच ?—अगबाई—!

**उद्धव** —असं भलतंच कांहीं तरी होतं, म्हणून पुरुषांशीं फार सलगी करूं नये म्हणतों मी !

**विजया**—पण मी बरं-वाईट समजणारी शिकलेली नवयुवति आहे; पूर्वीच्या युगांतील अडाणी—बावळी—बाहुली नाहीं—

**उद्धव**—नसशील. पण अमृतराव, विभाकरपंत हे पुरुष आहेत.

**विजया**—ते बायका नाहींत हा त्यांचा गुन्हा वाटतं ?

**उद्धव**—काय सांगायचं तुला ? मला बोलतां येत नाहीं. अग, पुरुषांना केव्हां कसा मोह उत्पन्न होईल हें सांगतां येत नाहीं.

**विजया**—पण अमृतराव आणि विभाकरपंत यांच्याबद्दलहि खात्री नाहीं?

**उद्धव**—अमृतराव सरळ आहे, उत्तम आहे, पण बेफाट वागतो. जमलं तर सूत, नाहीं तर भूत! त्याच्यांत आत्मसंयमन जरा कमीच. विभाकरपंत त्याच्यापेक्षां जरा घिम्मा—पण किती झालं तरी दोघेहि पुरुष—आणि तरुण पुरुष– तूं अविचारी तरुणी—आणि सुंदर—

**विजया**—ते पुरुष हा त्यांचा गुन्हा—तशी मी सुंदर हा माझा गुन्हा ?

**उद्धव**—खरं बोलायचं म्हणजे स्त्रियांचं सौंदर्य हेंच त्यांचं पाप! त्यांच्या सौंदर्यामुळं त्यांच्यावर जेवढ्या आपत्ती ओढवल्या आहेत तेवढ्या त्यांच्या पापबुद्धीमुळें आलेल्या नाहींत! या गोष्टी अनुभवाच्या आहेत; इथें वाद-विवादाचं काम नाहीं (उत्तर देण्याचा विजया प्रयत्न करते.) आणि वाद-विवाद करायला मला वेळ नाहीं.

**विजया**—पण मला पुष्कळ वेळ आहे.

**उद्धव**—फटकळपणाचीं तुझीं अशीं हीं उत्तरं तुझी विनोदबुद्धि दाखवतात; आणि त्यांत गैर असं फारसं नाहीं. पण आज बोलण्यांतच फाजीलपणा करतेस, उद्यां तो कृतींतहि उतरेल अशी मला भीति वाटते आणि म्हणून पुन्हा आतां निक्षून सांगतों–लक्ष देऊन ऐक—अमृतराव आणि विभाकरपंत आतां येतील; त्यांना मीं सरळ लिहिलं आहे. लग्न करायचं असलं तर तें निश्चित कर. कुणाशींच करायचं नसलं तर त्यांचं इकडे येणं बंद; दुसरीकडेहि गांठीभेटी घेतां कामा नयेत. विस्तवाशीं खेळण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मनांत कांहीं वाईट नसेल, पण जनाची कांहीं लाज आहे कीं नाहीं ? आज वाङ्निश्चय कर, नाहीं तर गांठीभेटी बंद कर. मला हा अब्रू दवडणारा अर्धवटपणा चालणार नाहीं.

**विजया**—पण मला चालतो ना ?—

**उद्धव** --तुला चालत असल्यास मग बंगल्यांतूनहि चालावं लागेल. आम्हांला कांहीं अब्रू आहे का नाहीं? बरं आतां जातों. विचार करण्याकरितां वेळ देतों. [ जातो.

**विजया**— बाबांनीं मला विचाराला वेळ दिला आहे--पण विचार काय करायचा आणि निश्चय काय करायचा, कोणता करायचा, कसा करायचा—?

( पद गुणगुणते. )

बस्स, विचार करायचा नाहीं हाच विचार आणि हाच निश्चय. मंडळी यायची वेळ झाली, घरांत जाऊन आईला मदत करावी. ( जाऊं लागते तों **विभाकरपंत** प्रवेश करतात.)

**विभाकर** --मला यायला उशीर झाला का?

**विजया** --नाहीं-नाहीं. उलट लवकर आलेत.

**विभाकर** —विजये, बाबासाहेबांचं पत्र आलं आहे एक.

**विजया** —बाबांनीं मला सांगितलं आतांच सगळं.

**विभाकर** —मग तुझा काय निश्चय ठरला?

**विजया** —वाङ्निश्चय करायचा नाहीं, हाच निश्चय ठरला!

**विभाकर** —मग उद्यांपासून हा बंगला वर्ज्यच झाला म्हणायचा! पुन्हा इथं आपली भेट व्हायची नाहीं.

**विजया** —इथं नाहीं, तर बाहेर भेटूं! बंगल्याबाहेर जग आहे ना?

**विभाकर** —बाहेर कुठं भेटायचं नाहीं असं लिहिलं आहे.

**विजया**— मग भेटूं नका, काय अडणार आहे?

**विभाकर**--माझं अडेल! गणेशचतुर्थीला चंद्रकलेकडे पाहूं नये म्हणतात, त्या वेळेला न पाहिल्यानं त्या चंद्रकलेचं अडेल अशांतला कांहीं भाग नाहीं; पण सौंदर्यलोलुप लोकांना मात्र तो प्रतिबंध जाचक वाटतो.

**विजया** --पण पाहणाऱ्यावर चोरीचा आळ येतो म्हणतात--

**विभाकर** --चोरीच्या आळाचं काय? प्रत्यक्ष चोरी करायची देखील माझी तयारी आहे! उद्धवरावांच्या देखत राजरोस तुझी चोरी करून--

**विजया** --पण मी चोरी करून नाहीं दिली तर--

**विभाकर** --मग माझं आयुष्य अंधकारमय होईल तुझ्याशिवाय, विजये-

**विजया** —विजयेचा दिवा नाहीं मिळाला तर विजेचा असेल ना ? नाहीं तर दुसरे कसले तरी दिवे लावा ! म्हणजे चांगला प्रकाश पडेल आयुष्यावर !

**विभाकर** --दिवे लावायचे असते तर विजयेकडे आलों नसतों. दिवे लावायचे मार्ग आमच्यासारख्यांच्या लागीं नाहींत.

**विजया** —पण मी म्हणतें, तुमचं आयुष्य अंधकारमय होईल म्हणून मीं तुमचं लोढणं गळयांत बांधून घ्यावं हा कुठला न्याय ? खरं बोलायचं म्हणजे तुमच्याबद्दल मला पुष्कळ आदर आहे; पण तुम्ही तेवढे आवडत नाहीं. तेच अमृतराव कसे आहेत पहा ! कसा देशाभिमान आहे; कसा स्वार्थत्याग आहे; कसं शौर्य आहे; कसं धैर्य आहे; कसं धाडस आहे; तुमच्यामधें हे गुण आहेत का ?

**विभाकर** --काय उत्तर देणार मी ? ( पुटपुटतो ) अमृतरावांचं सोंग-- ( जीभ चावतो.)

**विजया** --काय म्हटलंत ? 'अमृतरावांचं सोंग'... ?

**विभाकर** --अमृतरावांच्या गुणांचं सोंग कसं आणतां येईल ? बाकी मी एवढं म्हणेन कीं, अमृतरावामधें जे गुण आहेत ते माझ्यांत आज दिसत नसले तरी थोडेबहुत असतील असं वाटतं. ते दाखविण्याची संधि मला मिळत नाहीं, त्याला मी काय करूं ? शौर्य आणि धाडस दाखवण्याकरितां सत्याग्रहासारख्या मला न पटण्याऱ्या गोष्टी मी करूं ! अमृतरावाचे देशाभिमानाचे आततायी मार्ग मला पंसत नाहींत, तरी ते मी देशाभिमान दाखवण्याकरितां स्वीकारूं ? प्रसंग आला म्हणजे माझ्यामधेंहि नीतिधैर्य— स्वार्थत्याग—

**विजया** --प्रसंग येऊन हे गुण दिसले म्हणजे मीहि त्यांचा विचार करीन. सूर्योदय झाल्यावर कमलिनी न सांगतां आपोआप फुलतात. गुलाब दिसल्यावर--

**विभाकर** --पण गांठीभेटी झाल्या नाहींत तर दिसणार कसे हे गुण ?

**विजया** —आंब्याला मोहोर आल्यावर त्याचा सुगंध आपोआप सगळीकडे सुटतो, आणि तो सगळ्यांना कळतो. रत्न कोणाची मागणी करायला जात नाहीं; त्याची मागणी करायला सगळीं जातात. " न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत्." संस्कृत विसरले नाहींत ना अजून ?

**विभाकर** —वडिलांच्या आज्ञेविरुद्ध गांठीभेटी घेणं न घेणं हा संस्कृतचा प्रश्न नसून मनाच्या संस्कृतीचा प्रश्न आहे. ( गंभीरपणें ) विजये, तूं फटकळ-पणानें बोलतेस, तूं नवमतवादी आहेस, थोडासा नटवेपणा करतेस—

**विजया** —थोडासा कां ? —पुष्कळ...

**विभाकर** —खरं आहे तें बोलायचं म्हणून बोललों क्षमा कर. पण तुझ्या मनाच्या मोकळेपणाकडे, सरळपणाकडे, निर्भयपणाकडे, आणि औदार्याकडे पाहून तुझीं मतं पसंत नसतांना आणि तुझं वागणंहि थोडंसं नापसंत असतांना तुझ्याशीं लग्न करायला मी उत्सुक आहें यावरून गुणांची मला पारख आहे, लोकमताला न भिणारा मी आहें, रत्नाची पारख करून त्याची मागणी करणारा आहें, हें दिसत नाहीं का ? तूं स्वतंत्रबुद्धीची आहेस हें मला ठाऊक आहे, पण मी तुला आश्वासन देतों, कीं मी तुला पूर्ण स्वातंत्र्य देईन ! कारण स्वातंत्र्याचा तूं दुरुपयोग करणार नाहींस अशी माझी खात्री आहे.

**विजया** —स्वातंत्र्य तुम्ही कोण देणार ? मी जन्मतःच स्वतंत्र आहे आणि स्वतंत्रच राहणार.

**विभाकर** —बरं आहे. तूं स्वतंत्र राहा. मी परतंत्र होतों. मी तुझा दास व्हायला तयार आहे. नेहमीं तुझ्या अर्ध्या वचनांत राहीन. तुझे शब्द झेलीन.

**विजया** —अर्ध्या वचनांत राहणारा अर्धवट नवरा बायकांना आवडत नाहीं. ज्याचे शब्द लोक झेलतात त्यानें आपले शब्द किरकोळ बाबतींत झेलले तर बायकांना धन्यता वाटते ! पति स्वतःपेक्षां अधिक शहाणा असावा आणि त्यानं स्वतःचं म्हणणं चालवावं अशी बायकांची मनांतील इच्छा असते. एकसारखं पुढें पुढें करणारा पति त्यांना मनापासून आवडत नाहीं. “ पति दास, आणि बायको उदास ” अशी आमच्यांत म्हणच आहे !

**विभाकर** — चांगलं आहे मत !

**विजया** —इतका वेळ फटकळपणानं मी कांहीं तरी बोललें; पण, विभाकर-पंत, खरं बोलायचं म्हणजे—वाईट वाटतं सांगायला—पण वाङ्निश्चय करायला लावणारं प्रेम वाटत नाहीं त्याला मी काय करूं ? ( गंभीरपणानें ) देशांत बावळेपणा माजलेला आहे तो मला घालवायचा आहे आणि तो

घालवून देण्यांत मदत करणारा, धडाडीचा, निर्भय आणि स्वार्थत्यागी पति मला मिळाला तर पाहिजे आहे.

( **नर्मदा** खांकरते व प्रवेश करते.)

**नर्मदा** —तिकडे आईसाहेब बोलावताहेत विभाकरपंतांना.

**विभाकर** —जातोंच मी दोनतीन मिनिटांत. नाहीं तर आतांच जातों. ( सुस्कारा सोडून ) तुमचा नकार ऐकून आईसाहेबांना फार वाईट वाटेल. त्यांना फार आशा होती— पण बोलण्यांत अर्थ नाहीं. तुमच्या नकारामुळं माझ्या आयुष्यांत क्रांति होणार आहे. जातों मी.

**चक्रधर** —(प्रवेशून) ( विभाकरपंतांस ) अमृतराव यायला अवकाश आहे अजून; तोंपर्यंत ब्रिज खेळूं. येतां का ?

**विभाकर** —उत्तम. मला असंच कांहीं तरी पाहिजे होतं अशा वेळीं. ( विजयेकडे वळून ) जातों मी. ही शेवटचीच भेट म्हणायची !

**विजया** —शेवटली कां ? बाबांनीं कांहीं म्हटलं तरी मी आपली भेटेन तुम्हांला. तुम्हीच बाबांच्या धमकावणीला भीत असाल तर मात्र गोष्ट निराळी.

**विभाकर** —पुढें पाहूं तें ! [ जातो.

**विजया** —( नर्मदेकडे पाहून ) नर्मदे, कां ? —रडतेस कां ?

**नर्मदा** —काय सांगूं विजुताई ! पाप घडलं. मला दिवस—

**विजया** —त्या पाजी मनुष्याचं नांव काय ? विभाकरपंत तर नाहींत ? बाकी ते तसे नसावेत. काय ग, कुणी तुला पापांत ढकललं ?

**नर्मदा** —माझ्या दुर्दैवानं आणि तुमच्या बोलण्यानं ?

**विजया** —म्हणजे ?

**नर्मदा** —स्त्री-पुरुषांनीं एकत्र बोलावं-चालावं, समाजाला भिऊं नये, विवाहसंस्थेची आतां जरूरी नाहीं—या तुमच्या मतांचा परिणाम—

**विजया** —माझ्या मतांचा परिणाम ? अग, पण मी कधीं तुझ्याशीं या विषयावर—

**नर्मदा** —माझ्याशीं नाहीं बोललांत; पण लोकांशीं तुमचीं चाललेलीं बोलणीं मी ऐकत असे ना ? त्यांनीं मला भूल पाडली; आणि आतां मीं तोंडघशीं पडलें आहे ! ताईसाहेब, बड्या लोकांना यावर औषधं मिळतात आणि त्यांचं सगळं निभावून जातं. पण—

**विजया** —आहे, खरं आहे तुझं म्हणणं. पाऊल वांकडं पडून पापाच्या खड्डयांत बडे लोक पडले तर त्यांना आसपासचे लोक त्यांना बाहेर काढतात, पण गरिबांना धोंडे मारून ते बुडवून टाकतात. असा भांडवलशाहीचा न्यायच आहे. बरं, होऊं नये तें झालं; पुन्हा असं करूं नकोस.

**नर्मदा** —पुन्हा कसली करतें ताईसाहेब ? ( रडते. )

**विजया** —अग, रडतेस किती ? रडून काय उपयोग ? काळजी करूं नकोस. मी पैसे देईन तुला, आणि दिवस भरले कीं डॉ. रोखीवाल्यांच्या इस्पितळांत पाठवीन—

**नर्मदा** —हे शेजारचे डॉ. रोखीवाले ?

**विजया** —हो. ते बाळंतपणाच्या कामांत फार वाकबदार आहेत.

**नर्मदा** —ते नको बाई ! ते पैसे फार मागतात आणि भलतेसलते प्रश्न विचारतात म्हणे !

**विजया** —अग, प्रेमशास्त्रावर त्यांना वात्स्यायनासारखं पुस्तक लिहायचं आहे म्हणून ते प्रश्न विचारून माहिती गोळा करीत असतात. आपल्याला त्याच्याशीं काय करायचं आहे ? आपलं काम बिनबोभाट झालं म्हणजे झालं ! काळजी करूं नकोस. जा आतां.

**नर्मदा** —ताईसाहेब, किती चांगल्या आहांत हो तुम्ही ? तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं मी ! [ जाते.

**विजया** —माझ्या फटकळ बोलण्याचा हा परिणाम ! अज्ञानी लोकांपुढें कांहीं गोष्टी बोलूं नयेत हें मला समजत होतं; पण इतके दिवस उमजलं नव्हतं. बर्ट्रॅन्ड रसेलचीं मतं अडाणी लोकांपुढें बोललें हें माझं चुकलं खरंच. जीभ थोडीशी आवरली पाहिजे. नवमतवादी बोलण्याचा निखारा एखादे वेळीं अशी आग लावायचा, ही गोष्ट माझ्या ध्यानांत नाहीं आली. अमृतराव जसे सद्धेतूनंच पण अविचारानं कांहीं गोष्टी करून जातात आणि मग पस्तावा पावतात, तसा आज मला अनुभव येत आहे. नवीन अनुभव आहे हा. विद्वानांनीं अनेकदां सांगून जें पटलं नाहीं तें या एका अनुभवानं पटलं. ( विचाराक्रांत उभी राहते. चंद्रिका दाराशीं उभी राहते. )

**चंद्रिका** —येऊं का आंत ?

**विजया** —कोण ! चंदू ! तूं का ! ये.

**चंद्रिका** --विजू, तुला एकदम एक प्रश्न विचारूं का ?

**विजया** --प्रश्न विचारण्याला दुसऱ्या प्रश्नाची प्रस्तावना कशाला ? सरळ उत्तर ऐकण्याची तयारी असली तर विचार.

**चंद्रिका** —तुझी आई म्हणत होती, कीं तुझं लग्न विभाकरपंताशीं ठरत आहे. तें खरं ना ? लोक म्हणत आहेत ठरलं आहे.

**विजया** --रिकामटेकड्या लोकांनीं आपल्या मनांत ठरवलेलं आहे.

**चंद्रिका** --तूंहि आपल्या मनांत ठरव ! किती चांगले आहेत ते. विभाकरपंताशीं तुझं ठरलं म्हणजे अमृतराव तुझ्या नादीं लागणार नाहींत.

**विजया** --अमृतरावाशीं लग्न करायला तुला मिळावं म्हणून विभाकरपंताशीं मीं लग्न करावं हा न्याय चांगला आहे ! लँकेशायरमधील गिरण्यांना फायदा व्हावा म्हणून हिंदुस्थानानं कापूसच पिकवावा, स्वतः गिरण्या काढूं नयेत, अशांतला तुझा हा न्याय आहे. एका गाईला कुरणांत चरायला मिळावं म्हणून दुसरीनं आपले पाय जखडून घ्यावेत असं तुझं म्हणणं दिसतंय् ! बरं, विभाकरपंत एवढे चांगले आहेत म्हणतेस तर तूंच त्यांच्याशीं लग्न कर ना ? विचारूं त्यांना ? आले आहेत ते ! नाहीं तर आमच्या चक्रधराशीं कर. बाबांनाहि तें पसंत होईल. चक्रधर चांगला आहे, आणि त्याचं प्रेमहि आहे तुझ्यावर ! मग काय ?

**चंद्रिका** —अमक्यावर प्रेम कर म्हणून प्रेम करतां येतं का ?

**विजया** —अमक्यावर प्रेम करूं नको म्हणून सांगून प्रेम आवरतां येतं का ?

**चंद्रिका** —विजू, तुझ्याशीं मला वादविवाद करतां येत नाहीं. तूं विलायतेला जाऊन आलेली केंब्रिज बी. ए., आणि मी कशीबशी बी. ए. पर्यंत गेलेली शाळामास्तरीण. वादांत तूंच जिंकणार ! पण विजू, स्त्रीचं मन तुला तरी समजलं पाहिजे. पुरुषासारखा पोशाख केलास, तरी तूं स्त्री आहेस. चांगली शिकलेली, कुलीन स्त्री आहेस. मैत्रिणीच्या ठरलेल्या लग्नाचा बिघाड करणं—

**विजया** —ठरलेल्या काय, पण झालेल्या लग्नाचा देखील बिघाड सुशिक्षित स्त्रियांनीं केलेला आहे ! प्रेमापुढं मैत्री नाहीं, बहिणीबहिणींचं नातं नाहीं—कांहीं नाहीं. प्रेमापुढं राज्याची किंमत नसते, अब्रूची नसते—कश्शाची नसते. असे किती दाखले तुला दाखवूं मी ?

**चंद्रिका** —पण तशांतली तूं नाहींस—

**विजया** --स्तुति करून काम साधून घेण्याची युक्ति माझ्याजवळ उपयोगी पडायची नाहीं. ( स्वर बदलून ) इकडे ये. तुझ्याशीं जरा मन मोकळं करून बोललं पाहिजे.

( सावित्रीकाकू प्रवेश करून दचकतात. )

**सावित्री** —म्हटलं पुरुष कोण आहे! विजू, लांबून मी फसलें कीं अगदीं–

**चंद्रिका** --तुम्हीं सांगितलं म्हणून मीं विनंति केली पण ती ऐकत नाहीं.

**सावित्री** —मीहि तिला कितीदां सांगितलं, कीं एकीचा वाङ्निश्चय झाल्यावर दुसरीनं तिथं बिब्बा घालणं पाप आहे; पण बाई ती ऐकते आहे कुठं?

**विजया** —आई, मी का बिब्बा घालतें? उगाच कांहीं तरी बोलायचं! मला त्यांनीं कधीं मागणी घातली नाहीं– कांहीं नाहीं. तुमच्याच मनाचे कांहीं तरी खेळ. ते एवढं म्हणत असतात, कीं चंद्रिकेशीं माझं लग्न ठरलं होतं, पण आतां मोडलं.

**चंद्रिका** —विजू, तुझं मन त्यांच्याकडे ओढ घेत नाहीं हें खरं बोलतेस ना अगदीं?

**विजया** --मनाच्या ओढीला मी काय करणार?

**चंद्रिका** —बोलूं-चालूं नये म्हणजे--

**विजया** --तूं नुसती विनंति करीत आहेस; बाबांनीं तर मला हुकूम केला आहे, कीं एक त्यांच्याशीं वाङ्निश्चय तरी कर, नाहीं तर बोलणं-चालणं तरी बंद कर.

**सावित्री** —असं कांहीं तरी ते करणार अशी मला त्यांची शंका आलीच होती त्यांच्या कालच्या बोलण्यावरून. अमृतरावांचा स्वभाव हट्टी नि एककल्ली असं आपण म्हणतों, पण त्यांच्यापेक्षांहि यांचा अधिक आहे. एकदां मनांत आलं, कीं कोणाच्या बापालाहि ऐकायचे नाहींत!

**विजया** —मीहि त्यांचीच मुलगी आहे. अमुक एक करायचं माझ्या मनांत आलं, कीं मी कोणाच्या बापाचं—स्वतःच्या बापाचंहि—ऐकत नाहीं. आई, तूं घरांतलं जरा पहा जा पाहूं. मला हिच्याशीं जरा खाजगी बोलायचं आहे.

**सावित्री** —खाजगी बोला, नाहीं तर उघड बोला. चिन्हं कांहीं मला

चांगलीं दिसत नाहींत. करा—खाजगी खलबतं करा—वडिलांची अवज्ञा करण्याचींहि खलबतं करा! जायला पाहिजे ना मी? ही पहा चाललें. [जाते.

**विजया**—चंदू, बाबांनीं कितीहि धमक्या घातल्या तरी मी अमृतरावांशीं बोलणार-चालणार, पण तुला त्यांत भिण्यासारखं आतां तरी कांहीं नाहीं. पुढचं कोण काय सांगणार? माझ्या मनाची आजची स्थिति अशी आहे कीं, कोणाशींच लग्न करूं नये असं मला वाटतं आहे! झालं ना तुझं आतां समाधान! जाऊं मी आईला मदत करायला? (चंद्रिकेच्या गालावर लडिवाळपणानें चापट मारून जाते.)

(**अमृतराव** प्रवेश करतात.)

**अमृतराव**—चंद्रिके, कोण आतां गेला तो गालावर लडिवाळपणानें चापट मारून? मी येत आहे असं पाहिल्यावर तो कां पळाला? चांगली आहेस कीं! विजया नवमतवाद नुसता बोलते, तूं आचरणांत आणूं लागलीस वाटतं? परपुरुषाशीं—

**चंद्रिका**—तो परपुरुष परत येतोच आहे पहा!

(**विजया** प्रवेश करते.)

**विजया**—चंदू, एक सांगायचं राहिलंच तुला. तें सांगायला आलें.

**चंद्रिका**—हाच तो परपुरुष, यानंच गालावर चापट मारली म्हणून तुम्हांला संशय आला.

**विजया**—असा प्रकार झाला वाटतं!

**अमृत**—बायका जर हुबेहूब पुरुषांसारखा पोषाख करूं लागल्या तर आतां काय करायचं?

**विजया**—पुरुषांनीं चांगड्या भरायच्या आणि बायकांसारखं संशयखोर व्हायचं, दुसरं काय करायचं आहे! आणि अलीकडचे तुम्ही पुरुष दुसरं काय करीत आहांत?

**अमृत**—तुझ्या वडिलांनीं मला पत्र लिहून त्यांचं मी जें कर्ज देणं आहे त्याची धमकावणीवजा आठवण करून दिली आहे. आणि तुझ्याशीं लग्न केलं नाहीं तर बोलणं-चालणं बंद केलं पाहिजे असा हुकूम सोडला आहे!

**विजया**—शेवटच्या मुद्द्याचा थोडक्यांत निकाल लावायचा म्हणून एकदम सांगतें, कीं तुम्हांला जसा कर्जाचा बोजा नको आहे तसा लग्न करण्याचा बोजा मला नको आहे.

**अमृत**—पण त्यांनीं मला असं पत्र कां लिहावं? या पत्राचा अर्थ मला समजत नाहीं.

**विजया**—अर्थ स्पष्ट आहे.

**अमृत**—पण मला तुझी मागणी करायची आहे हें सांगितलं कुणी त्यांना? मीं कधीं मागणीची गोष्ट काढली होती का?

**चंद्रिका**—मी जवळ आहे म्हणून हीं बोलणीं आहेत; मला सगळं समजतंय्.

**अमृत**—मला मागणी घालायचीच नाहीं. प्रेमाच्या गोष्टी बोलायला मी आलोंच नाहीं. मला आतां तुझं प्रेम नको आहे.

**विजया**—मग काय! माझ्याबरोबर येणारा हुंडा? (जीभ चावून) क्षमा करा, मीं भलता आरोप केला त्याबद्दल. फटकळ कोट्यांचा मोह मला आवरत नाहीं. पण माझ्या फटकळ बोलण्याचा वाईट परिणाम होतो हें नर्मदेच्या उदाहरणावरून माझ्या चांगलंच ध्यानांत आलं आहे. पण खोड जात नाहीं—क्षमा करा.

**अमृत**—नर्मदेचं तें प्रकरण म्हणजे तुझ्या बोलण्याचा परिणाम हें थोडंसं खरं आहे. ज्यांना सारासार विचार नाहीं, त्यांच्यापुढं तूं नवमतवादी भाषणं आणि कोट्या करतेस हें चांगलं नाहीं. आम्ही त्यांतला भावार्थ घेतों आणि बाकीचं सोडून देतों; पण सामान्य लोकांना एवढा विवेक कुठला?—पण हें अप्रस्तुत आहे. मी जें बोलण्याकरितां आलों आहे तें असं कीं, पूर्ण विचारान्तीं माझा एक निश्चय झाला आहे—

**विजया**—चंद्रिकेशीं वाङ्निश्चय करण्याचा का?

**अमृत**—नाहीं. लग्नाचे विचार मीं अजिबात सोडले. मला ते अतिशय क्षुद्र वाटत आहेत. देशाला आग लागली आहे आणि मी प्रेमलीलांमधें गुंग आहे हें पाहून माझं मन उद्विग्न होत असे आणि कधीं कधीं भडकत असे. आज मात्र मी सात्त्विक आनंदाची शांति उपभोगीत आहें—कारण माझ्या कांहीं मित्रांनीं सर्वस्वाची आहुति देऊन सत्याग्रहाच्या युद्धांत पुन्हा जायचं ठरवलं आहे,

आणि मला त्यांनीं पुढारी नेमलं आहे. देशसेवेचं हें काम माझ्याकडे आल्यानें मी आज दिव्य आनंद उपभोगीत आहे. सत्याग्रहांत मृत्यु आला तर स्वर्ग मिळेल कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं; पण येवढं निश्चित कीं मी आतां स्वर्गीय आनंद उपभोगीत आहे.

( **उद्धवराव** येतात. )

**उद्धव** —(आनंदानें) स्वर्गीय आनंदाची भाषा– कॉंग्रॅट्स्. आधीं अभिनंदन करून मग शुभाशीर्वाद देतों. तुमचं लग्न ठरलं म्हणून तुम्हांला स्वर्गीय आनंद होत आहे त्यांत मीहि भागीदार आहें. पण, अमृतराव, हा सत्याग्रहाचा नाद सोडा. मी तुम्हांला सगळं कर्ज माफ करीन, इस्टेटीचा कांहीं भागहि देईन तुमचं लग्न झाल्यावर. तुम्हांला पत्र लिहिलं म्हणून हा योग लवकर जमून आला. विजू, माझे आभार मान.

**विजया** —कशाबद्दल आभार? लग्नाचा विचार सोडून हे सत्याग्रहाच्या युद्धांत पुन्हा उडी घेणार म्हणून?

**उद्धव** —म्हणजे?

**अमृत** —बाबासाहेब, देशमातेची मला प्राणान्त सेवा करण्याची संधि मिळाली आहे म्हणून मला स्वर्गीय आनंद होत आहे हें सगळ्यांना सांगण्याकरितां—आणि तुमचा आशीर्वाद घेण्याकरितां—मी आलों आहें.

**उद्धव** —अस्सं! माझा होरा चुकला म्हणायचा!

**अमृत** —मला कर्ज माफ नाहीं केलंत तरी चालेल, आणि आपल्या इस्टेटीचा भागहि मला नको आहे. मी सत्याग्रहांत पडणारच.

**उद्धव** —असा दुराग्रहच असेल तर मघांशी केलेलं अभिनंदन मी परत घेतों.

**अमृत** —परत घेण्याची जरूर नाहीं. लग्न ठरलं म्हणून मला स्वर्गीय आनंद होत होता ही तुमची गैरसमजूत झाली.

**उद्धव** —तुम्ही तिच्याकडे अलीकडे वारंवार येतां जातां तें विवाहेच्छेमुळेंच असं मी समजलों ही माझी गैरसमजूत झाली हें कबूल! तिच्याकडे तुमच्यासारख्यांचे बेत आमच्यासारख्यांना कसे कळणार? तुम्हांला विजयेकडे संधान साधून कांहीं तिच्याकडून पैसे उपटायचे होतें, का दुसरं कांहीं सुख—

**अमृत** —बाबासाहेब, भलत्या कल्पना मनांत येऊं देऊं नका.

**उद्धव** –मनांत कांहीं येऊं देत नाहीं. पण यापुढें येथें येऊन 'स्वर्गीय सुख' तुम्हांला मिळायचं नाहीं हें ध्यानांत धरा. सत्याग्रहांत पुढारी म्हणून उडी घेण्याची संधि मिळाली हें सांगतांना तुम्हांला जसा स्वर्गीय आनंद होत आहे, तसा मलाहि एक गोष्ट सांगतांना लौकिक उद्वेग वाटत आहे. ती गोष्ट ही, कीं या बंगल्यांतली ही आपली भेट शेवटची. उद्यांपासून या बंगल्यांत पाऊल टाकायचं नाहीं. ( विजयेस ) विजू, यांच्याशीं यापुढं कांहीं एक संबंध ठेवावयाचा नाहीं. सत्याग्रहाच्या बंडांत हे वारंवार शिरूं लागले आहेत; यांच्याशीं माझ्यासारख्यांना संबंध ठेवतां येणार नाहीं. हे आपली जहागीर घालवून बसले आहेत तशी आमची 'सर' पदवी आणि मिळालेली इस्टेट नाहीं तर सगळी जायची! ठरलं तें ठरलं. या वेड्यापीरांना सत्याग्रहाच्या विस्तवाशीं खेळून देशाची होळी करण्यांत मौज वाटत असेल, आम्हांला असं करतां येत नाहीं. झाला तेवढा खेळ-खंडोबा पुष्कळ झाला ! विजू, पुन्हा बजावून सांगत आहें. माझ्याशीं गांठ आहे. उद्यांपासून यांचं दर्शनहि घ्यायचं नाहीं. सगळा पोरखेळ चालवीत होतां इतके दिवस !

**विजया** —मी आतां पोर नाहीं आणि खेळहि पण चालविलेला नाहीं. मी तेवीस-चोवीस वर्षांची जाणती झालेली आहें. आणि गंभीरपणानं सांगतें कीं, मी यांच्याशीं बोलणार, चालणार. मला त्यांत गैर कांहीं दिसत नाहीं.

( **चक्रधर** भीत भीत प्रवेश करतो.)

**उद्धव** —पण मला दिसतं आहे ना ! तुम्हां तरुणांचीं मनं बहकलीं तरी आम्हांला आमचीं मनं बहकून देऊन चालायचं नाहीं. विवाहापूर्वीच्या प्रेमाला सलगीची मोकळीक देणं म्हणजे जळत्या निखाऱ्याला गवताच्या गंजीशीं सलगी करूं देण्यासारखं आहे. यांना आज बोलावलंच आहे तेव्हां खुशाल बोला-चाला आज; पण उद्यांपासून हें घर विषासारखं वर्ज्य समजा.

**अमृत** —बरं आहे. ( चंद्रिकेकडे वळून ) झालं तुझं समाधान ? कोणत्या का कारणानं असेना, तुझं आपलं काम झालं. एकाचा तोटा तो दुसऱ्याचा लाभ असतो तो असा ! ( उद्धवरावांकडे वळून उपरोधिक स्वरानें ) बाबा-साहेब, घर वर्ज्य करायचं म्हटलंत पण कर्जफेडीकरितां इकडे येऊं का नको ?

**उद्धव**—( रागानें ) स्वतः यायला नको; पैसे पाठवून देतां येतात. आणि हे पैसे लवकर आले पाहिजेत बरं का ? नाहीं तर कायदेशीर इलाजावर यावं लागेल. होतां होईतों तो प्रसंग लांबणीवर टाकीन. पण किती म्हटलं तरी व्यवहार म्हणजे व्यवहार. कर्जफेड लवकर झाली नाहीं तर तुरुंगांत जाण्याचा प्रसंग यायचा, तो टाळलेला बरा.

**अमृत**—विजयेशीं लग्न करून चतुर्भुज करण्याचं जुळलं नाहीं, तेव्हां दुसऱ्या अर्थानं चतुर्भुज करण्याचं हें कठोर कर्तव्यकर्म खुशाल करा !

**विजया**—राजद्रोही भाषणांबद्दल सरकारच त्याच्या आधीं चतुर्भुज करील कदाचित् !

**अमृत**—आपण सगळा राग पोटांत घालून मनापासून खटला चालवला तर सुटण्याची आशा आहे; नाहीं तर नाहीं, हें सिद्धच आहे.

**उद्धव**—मी यापुढें खटला चालविणार नाहीं. तुमच्याकरितां मीं मोफत काम कां करावं ? फी नाहींच; इतर खर्चहि मींच करायचा; हा धंदा इतके दिवस केला, आतां तो पुरे झाला. अमृतराव, तुमची योग्यता मी ओळखतों; पण इलाज नाहीं. वाईट वाटतं. ( विजयेला ) विजू, आमचे संबंध यापुढें कसे होणार हें समजलं ना ? उद्यांपासून यांच्या वाड्याची वाट ठाऊक नाहीं असं समजायचं. आपल्या घरीं त्यांना कधीं बोलवायचं नाहीं— ( **सावित्रीबाई** प्रवेश करते. सावित्रीबाईकडे वळून ) तुमच्या या लाडक्या कन्यकेला काय ताकीद केली आहे हें समजलं का ?

**सावित्री**—समजलं. सगळं ऐकत होतें मी घरांतून. इतकी आग पाखडायला असं वाईट काय केलं आहे कुणी ? लोकं पाहिजे तें म्हणतील—

**उद्धव**—आणि हीं पाहिजे ते करतील ! अविवाहित तरुणींनीं पुरुषांशीं विशेष सलगी केलेली मला नाहीं आवडायची ! त्यांतून या अमृतरावांशीं तर नाहींच आवडायची. राजद्रोही भाषण करतोच आहे, आणि दोन पिस्तुलं लपवून—

**अमृत**—कशावरून म्हणतां हें ?

**उद्धव**—पोलिसांकडे रिपोर्ट आहेत आणि लोक असं म्हणतात म्हणून.

**विजया** —रिपोर्टांवर आणि लोकांच्या गप्पांवर तुमच्यासारख्या वकिलांचा विश्वास बसावा हें आश्चर्य आहे! 'सर' पदवी याबद्दलच मिळाली वाटतं?

**उद्धव** —मला तुझ्याशीं वाद करायचा नाहीं. यांच्यासारख्यांशीं संबंध ठेवायचा आणि मिळवलेली इस्टेट आणि पदवी गमावून बसायचं हा व्यवहार आम्हांला येत नाहीं. विजे! समजला ना माझा हुकूम? 'हुकूम' म्हणतों आहे मी!—

**विजया** —समजला; पण असले हुकूम मी मानत नसतें.

**सावित्री** —असं बोलूं नये बाळ!—

**विजया** —आई, आतां मी बाळ नाहीं. चांगली मोठी बाई आहें.

**उद्धव** —हुकूम मानायचा नसला तर घरांतून चालती हो. आतांच्या आतां चालती हो.

**विजया** —ही निघालें मी! इतके दिवस तुम्हीं पालनपोषण केलंत, शिक्षण दिलंत, हे उपकार मी कधींहि विसरणार नाहीं. आईकरतां जीव इथं अडकतो आहे, पण इलाज नाहीं! तिच्याकरतां पत्रानं मी खुशाली कळवत जाईन. पण तुम्हीं बोलावल्याशिवाय या घरांत पाऊल टाकणार नाहीं. पत्रानं देखील कसली याचना करायची नाहीं, आणि तुमच्या कवडीलाहि कधीं शिवायची नाहीं, अशी माझी प्रतिज्ञा आहे!

**उद्धव** —प्रतिज्ञा! भीष्मच कीं नाहीं तूं!

**सावित्री** —विजू-बाळ, जरा विचार कर.

**चक्रधर**— ताई, जरा विचार कर.

**विजया** —विचार पूर्वींच केलेला आहे. असं केव्हां तरी होणार हें मला वाटतच होतं. सुशिक्षित बापांना देखील आपल्या मुली ताटाखालचीं मांजरं वाटतात. पण आतां तो काळ गेला. मी स्वतंत्र आहें; आणि स्वतंत्रपणें वागणार. कुठेंहि पोटापुरतं मिळवून राहीन मी.

**सावित्री** —एकटी?—

**विजया** —हो. एकटी! मनांत डर नाहीं त्याला वनांतहि डर नसते!

**उद्धव** —( रागानें ) स्वतः यायला नको; पैसे पाठवून देतां येतात. आणि हे पैसे लवकर आले पाहिजेत बरं का ? नाहीं तर कायदेशीर इलाजावर यावं लागेल. होतां होईतों तो प्रसंग लांबणीवर टाकीन. पण किती म्हटलं तरी व्यवहार म्हणजे व्यवहार. कर्जफेड लवकर झाली नाहीं तर तुरुंगांत जाण्याचा प्रसंग यायचा, तो टाळलेला बरा.

**अमृत** —विजयेशीं लग्न करून चतुर्भुज करण्याचं जुळलं नाहीं, तेव्हां दुसऱ्या अर्थानं चतुर्भुज करण्याचं हें कठोर कर्तव्यकर्म खुशाल करा !

**विजया** —राजद्रोही भाषणांबद्दल सरकारच त्याच्या आधीं चतुर्भुज करील कदाचित् !

**अमृत** —आपण सगळा राग पोटांत घालून मनापासून खटला चालवला तर सुटण्याची आशा आहे; नाहीं तर नाहीं, हें सिद्धच आहे.

**उद्धव** —मी यापुढें खटला चालविणार नाहीं. तुमच्याकरितां मीं मोफत काम कां करावं ? फी नाहींच; इतर खर्चहि मींच करायचा; हा धंदा इतके दिवस केला, आतां तो पुरे झाला. अमृतराव, तुमची योग्यता मी ओळखतों; पण इलाज नाहीं. वाईट वाटतं. ( विजयेला ) विजू, आमचे संबंध यापुढें कसे होणार हें समजलं ना ? उद्यांपासून यांच्या वाड्याची वाट ठाऊक नाहीं असं समजायचं. आपल्या घरीं त्यांना कधीं बोलवायचं नाहीं— ( **सावित्रीबाई** प्रवेश करते. सावित्रीबाईकडे वळून ) तुमच्या या लाडक्या कन्यकेला काय ताकीद केली आहे हें समजलं का ?

**सावित्री** —समजलं. सगळं ऐकत होतें मी घरांतून. इतकी आग पाखडायला असं वाईट काय केलं आहे कुणी ? लोकं पाहिजे तें म्हणतील—

**उद्धव** —आणि हीं पाहिजे ते करतील ! अविवाहित तरुणींनीं पुरुषांशीं विशेष सलगी केलेली मला नाहीं आवडायची ! त्यांतून या अमृतरावांशीं तर नाहींच आवडायची. राजद्रोही भाषण करतोच आहे, आणि दोन पिस्तुलं लपवून—

**अमृत** —कशावरून म्हणतां हें ?

**उद्धव** —पोलिसांकडे रिपोर्ट आहेत आणि लोक असं म्हणतात म्हणून.

**विजया** —रिपोर्टांवर आणि लोकांच्या गप्पांवर तुमच्यासारख्या वकिलांचा विश्वास बसावा हें आश्चर्य आहे! 'सर' पदवी याबद्दलच मिळाली वाटतं ?

**उद्धव** —मला तुझ्याशीं वाद करायचा नाहीं. यांच्यासारख्यांशीं संबंध ठेवायचा आणि मिळवलेली इस्टेट आणि पदवी गमावून बसायचं हा व्यवहार आम्हांला येत नाहीं. विजे! समजला ना माझा हुकूम ? 'हुकूम' म्हणतों आहे मी !—

**विजया** —समजला; पण असले हुकूम मी मानत नसतें.

**सावित्री** —असं बोलूं नये बाळ !—

**विजया** —आई, आतां मी बाळ नाहीं. चांगली मोठी बाई आहें.

**उद्धव** —हुकूम मानायचा नसला तर घरांतून चालती हो. आतांच्या आतां चालती हो.

**विजया** —ही निघालें मी ! इतके दिवस तुम्हीं पालनपोषण केलंत, शिक्षण दिलंत, हे उपकार मी कधींहि विसरणार नाहीं. आईकरतां जीव इथं अडकतो आहे, पण इलाज नाहीं ! तिच्याकरतां पत्रानं मी खुशाली कळवत जाईन. पण तुम्हीं बोलावल्याशिवाय या घरांत पाऊल टाकणार नाहीं. पत्रानं देखील कसली याचना करायची नाहीं, आणि तुमच्या कवडीलाहि कधीं शिवायची नाहीं, अशी माझी प्रतिज्ञा आहे !

**उद्धव** —प्रतिज्ञा ! भीष्मच कीं नाहीं तूं !

**सावित्री** —विजू–बाळ, जरा विचार कर.

**चक्रधर**— ताई, जरा विचार कर.

**विजया** —विचार पूर्वींच केलेला आहे. असं केव्हां तरी होणार हें मला वाटतच होतं. सुशिक्षित बापांना देखील आपल्या मुली ताटाखालचीं मांजरं वाटतात. पण आतां तो काळ गेला. मी स्वतंत्र आहें; आणि स्वतंत्रपणें वागणार. कुठेंहि पोटापुरतं मिळवून राहीन मी.

**सावित्री** —एकटी ?—

**विजया** —हो, एकटी ! मनांत डर नाहीं त्याला वनांतहि डर नसते !

**सावित्री** —तुला एकटीला मी राहूं देणार नाहीं. पोटच्या पोरीला जर घालवून देणार असले तर मीहि तुझ्याबरोबर येतें.

**उद्धव**— तिला माझं ऐकायचं नसलं तर तिला घालवून देणारच आणि तिच्याबरोबर तुला जायचं असलं तर तूंहि जा पाहिजे तर. महायज्ञ करण्याचं ठरल्यावर मग काय ? इंद्राय स्वाहा, तक्षकाय स्वाहा !!

**विजया** —मी आपली जाणारच ! ही पहा चाललेंच ( जाऊं लागते. )

**चंद्रिका** —विजू, असं काय करतेस !

**विजया** —तूं कांहीं बोलूं नकोस. तुला कांहीं समजत नाहीं. मी जाणारच.

**सावित्री** —मग मीहि तुझ्याबरोबर येतें.

**उद्धव** —( सौम्य स्वरांत ) विजू, ये- इकडे ये. एक मिनिटभर थांब. ( विजया थांबते. ) पैशाची किंवा कशाची गरज लागली तर ये माझ्याकडे. लाज धरूं नकोस.

**विजया** —येईन. तुम्ही अडचणींत असलांत, नाहीं तर तुम्ही बोलावलंत, तर अवश्य येईन; पण याचना करायला जीव गेला तरी यायची नाहीं.

**उद्धव** —बरं आहे. तुझी मर्जी ! ( विजया जाऊं लागते, सावित्रीबाई रेंगाळत मागें पाहते. ) जा तूं, मी परत बोलवणार नाहीं. ( इतरांकडे वळून ) चंद्रिके जा घरांत, चक्रधर तूंहि जा. ( इतर सर्व जातात. अमृतराव राहतो.) अमृतराव तुम्हीहि जा. तुम्हांला तकलीफ झाली. क्षमा करा. विभाकरपंत ओशाळून ताटकळत बसलें असतील तिकडे. त्यांचीहि क्षमा मागितली आहे म्हणून सांगा.

**अमृत**— कांहीं दिवसांपूर्वी मीं मेजवानी दिली–तिचा शेवट तसा झाला, आजच्या मेजवानीचा असा झाला ! आपली योजना एक, आणि ईश्वराची दुसरीच ! ( अमृतराव जातात. उद्धवराव सचिन्त उभे राहतात. सावित्रीबाई परत येतात. )

**सावित्री**— नाहीं ना बोलवायची विजूला ? इतकं कसं बाई निष्ठुर होतां येतं पुरुषांना ?

**उद्धव** –कर्तव्य नेहमींच कोमल नसतं. कर्तव्याकरितां कांहीं वेळां आम्हांला

निष्ठुर व्हावं लागतं. विजूबरोबर जाणार आहेस ना तूं? खुशाल जा. तूंहि जावंस अशीच माझी इच्छा आहे. मी तिला बोलवणार नाहीं आणि तुलाहि नाहीं. [ जाते.

**सावित्री** —( पुन्हा येऊन ) मग नाहींच का बोलवायचं मुलीला?

**उद्धव** —( हलक्या आवाजांत ) अग! हें रागाचं नाटक आहे. तूं तिच्याबरोबर आहेस ना? सध्यां काळजी नाहीं. पुढें पाहूं काय करायचं तें. ( सावित्रीबाई 'समजला अर्थ' असें दर्शवून जाते. )

**उद्धव** —आजचं हें प्रकरण वाईटच झालं. पण कोणाचाच इलाज नव्हता. ( विचार करून ) पोरीच्या नशिबीं काय व्हायचं असेल तें होवो! पोर मात्र तेजस्वी खरी! नवीन वारं आलं आहे, त्यांत बिघडली नसती तर नांव काढलं असतं हिनें. भवितव्यतेपुढें इलाज नाहीं. स्वतंत्र राहायचं पोरगी म्हणते, पण यांत धोका आहे मोठा. तिच्याबरोबर 'ती' गेली आहे, हें दुःखांत सुखच म्हणायचं. मुलीच्या हिताकरतां कांहीं दिवसांपुरतं हें निष्ठुरपणाचं नाटक मी करीत आहें तें तिला हितकर होवो म्हणजे झालं! नाहीं तर सुखान्तिकेऐवजीं शोकान्तिका पहावी लागायची! [जातो.

## — अंक दुसरा समाप्त —

# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

[**स्थळ**--डॉ. रोखीवाले यांचा दवाखाना. **अमृतराव** खाटेवर निजले आहेत. **अंगार** लपत छपत येऊन पिस्तुल अमृतरावांच्या उशाखालीं लपवूं पहातो, इतक्यांत अमृतराव जागे होतात.]

**अमृत** --कोण, अंगार? कशाला इथें आला होतास?

**अंगार** --आपल्या समाचाराला.

**अमृत** --तोंड दाखवूं नकोस. चालता हो. तुला सोडलं कुणी आंत? कोण आहे रे तिकडे? (गडी येतो, गडी अंगारला जायला सांगतो. अंगार जातो.)

(**विभाकरपंत** व **विजया** येतात. त्या दोघांची व अंगारची दृष्टादृष्ट होते. विभाकरपंत व विजया अमृतरावजवळ येऊन बसतात.)

**विजया** --हा अंगार इथें कशाला आला होता?

**अमृत** --कुणाला ठाऊक कशाला आला होता.

**विजया** --हलकट आहे तो. त्याला जोड्याशीं देखील उभं करूं नये.

**अमृत** --खाल्ल्या घरचे वांसे मोजणारा आहे. पण जगांत अशीं माणसं असतात त्याला उपाय काय? बरं, विजया, तुला एक काम सांगूं का? चंद्रिकेला बोलावून घेऊन येतेस का? सकाळीं तिला भेटलों नाहीं म्हणून रागावली असेल.

**विजया** --चंद्रिका नाहीं रागावयाची, तशी ती शहाणी आहे. तरी पण मी जातें. तिला घेऊन येतें.

**विभाकर** --ह्या लाठीमारांत गच्छंतीचीच वेळ आली होती! पण शेपटावरच गेलं.

**अमृत** —हातावर गेलं म्हण ! हातावर शस्त्रक्रिया करावी लागेल म्हण-तात. त्यांत यश नाहीं आलं तर हात जाणार. शस्त्रक्रिया करावी का नाहीं या विचारांत आहें मी.

**विभाकर** —या बाबतींत डॉक्टरांचं म्हणणं ऐकावं. डॉ. रोखीवाले भलतंच सांगायचे नाहींत. त्यांच्यासारखे जाणते शस्त्रवैद्य मिळायचे नाहींत.

**अमृत** —आणि पांचशें रुपये घेतल्याखेरीज ते काम करायचे नाहींत ! मागच्या खेपेस पायाच्या शस्त्रक्रियेला तूं आपली चीजवस्त मोडून पांचशें रुपये दिलेस आणि चंद्रिकेनं मास्तरकी करून जमविलेल्या तीनशें रुपयांची भर घातली, तेव्हां कुठें त्यांच्या आठशें रुपयांचं बिल देतां आलं.

**विभाकर** —पण पाय दहा-बारा दिवसांत बरा झाला, तसाच हातहि बरा होईल लवकरच. तुझी प्रकृतीच तशी उत्तम आहे.

**अमृत** —पण पांचशें रुपये कुठून आणायचे ?

**विभाकर** —तुझ्यासारख्या जहागिरदारावर असा प्रसंग—

**अमृत** —आतां मी जहागिदारदार नाहीं. तुरुंगगडची जहागीर मिळल्यास त्या गडाचा जहागिरदार होईन कदाचित् ! —

**विभाकर** —भलतं बोलण्यांत काय अर्थ आहे ? शस्त्रक्रिया केलीच पाहिजे. आणि पांचशें रुपये कुठून तरी काढलेच पाहिजेत. आपल्या विजयेच्या वडिलांकडून आणखी कर्जाऊ नाहीं का मिळणार ?

**अमृत** —छत् ! मागच्याच कर्जाबद्दल त्यांनीं फिर्याद केली आहे आणि दिवाणी तुरुंगाची भीति दाखविली आहे !

**विभाकर** —पण विजयेच्या मध्यस्थीनें त्यांना थोपवून धरतां येईल. किती केलं तरी ती त्यांची मुलगी आहे.

**अमृत** —तिची मध्यस्थी आतां नको. चंद्रिकेनें माझा नाद सोडावा म्हणून विजयेवर प्रेम जडल्याचं सोंग केलं तें अंगाशीं येऊं पाहत आहे.

**विभाकर** —म्हणजे काय ?

**अमृत** —तुला आपल्या लहानपणची एक गोष्ट सांगतों म्हणजे तात्पर्य समजेल. आपण लहान होतों आणि चंद्रिका नि विजया परकऱ्या मुली होत्या. तेव्हां आंधळी कोशिंबीर खेळतांना त्या दोघींनींहि डोळे बांधून घेतले होते, आणि त्या आपणांला पकडीत होत्या. चंद्रिका मला पकडूं लागली तेव्हां मी

विजयेच्या पाठीमागें लपून उभा राहिलों. तेव्हां चंद्रिकेच्याऐवजीं तिनेंच मागें वळून मला पकडलें! लहानपणच्या खेळांतल्या या गमतीची आतां कांहीं बाबतींत पुनरावृत्ति होत आहे!

**विभाकर**—समजलों. समजलों. म्हणजे विजयेचं तुझावर प्रेम बसत चाललं आहे, असा थोडक्यांत अर्थ! पण यांत कांहींच नवल नाहीं. प्रेम खरं काय किंवा ढोंगाचं काय, विस्तवासारखं आहे. त्याच्याशीं भलता खेळ खेळूं नकोस म्हणून तुला मीं आधींच सांगितलं होतं, पण तुझ्या हट्टी स्वभावापुढं माझं कांहीं चाललं नाहीं. आतां मात्र तुला स्पष्ट सांगतों कीं, हा खेळ जर आणखी पुढें चालविलास तर तुझं नि माझं सख्य आहे त्यांत बिघाड होण्याचा संभव आहे. इतके दिवस मन आवरलं, पण विजयेला सगळ्या गोष्टी सांगून तुझं हें सोंग उघडकीस आणावं असा आतां निश्चय होऊं लागला आहे. मीं हें करण्यापूर्वी तूंच हें केलंस तर सगळ्यांत उत्तम.

**अमृत**—माझ्याकरतां इतके दिवस कळ सोसलीस तशी आणखी कांहीं दिवस सोस. बाबासाहेबांनीं चंद्रिकेला चक्रधराशीं लग्न करण्याबद्दल सुचवलं आहे. पहिल्या तारखेला ती होय किंवा नाहीं तें उत्तर देणार आहे. तिनें होय म्हटलं कीं, आमच्या सोंगाची कार्यसमाप्ति होईल.

**विभाकर**—कांहीं म्हटलंस तरी माझं यानें कांहीं समाधान होत नाहीं. तुझ्या-माझ्यामध्यें लवकरच गैरसमज उत्पन्न होऊन अखेर आपण वैरी होण्याचा संभव आहे असं माझं मन मला सांगतं. बायका जगांत नसत्या तर पुरुषांमधील अर्धीअधिक भांडणं कमी झालीं असतीं! स्त्री ही पुरुषांच्या कलाकृतीला जशी स्फूर्ति देते तशीच कलागतीलाहि कारणीभूत होते असं—

**अमृत**—स्त्रीपुरुषांचा प्रश्न सोडविण्यापेक्षां हातावर शस्त्रक्रिया करायची कीं नाहीं हा प्रश्न सोडवणं महत्त्वाचं आहे. मागच्या खेपेला चंद्रिकेनं माझ्याकरितां आपले दागदागिने मोडले हे तिचे माझ्यावर केवढे उपकार! आणि तिच्या प्रेमाची नि उपकाराची फेड म्हणून मी तिची फसवणूक करणार! प्रेमाचं, परिस्थितीचं, आणि कर्तव्याचं त्रांगडं आणि तिरपगडं विलक्षण आहे मोठं!

**विभाकर**—या विलक्षणतेमध्यें तूं आपल्या अविचारानें आणि हट्टी स्वभावामुळें थोडी भर घातली नाहींस कांहीं?

**अमृत**--तूं रागावलेला दिसत आहेस आणि मला आतां थोडासा थकवा वाटत आहे--पुढं बोलूं मग या विषयावर. विजयेच्या बाबतींत तुझ्याशीं मी दगलबाजी करीन असा संशय तर येत नाहीं ना?

**विभाकर**--संशय--येत नाहीं--येतोहि आहे! मनुष्याचं मन जितकं चांगलं तितकं वाईटहि आहे. विजयेचा ओढा माझ्यापेक्षां तुझ्याकडे अधिक दिसत आहे. माझ्या मनांत चमत्कारिक विचार-विकारांचा कल्होळ उठत आहे. विवेक करून मी आपल्या मनाचं संयमन करतों, ही गोष्ट वेगळी. पण लहानपणापासूनचे स्नेहाचे तंतु कितीहि चिवट असले तरी फारच ताण बसला म्हणजे ते तुटण्याचा संभव असतो. पहिल्या तारखेपर्यंतच तुझं हें प्रेमाचं सोंग टिकणार म्हणतोस हें तुझं ठीक आहे, पण माझी वाट काय? या अवधींत तिचं तुझ्यावर कायमचं प्रेम जडलं तर तूं तिला गुंगारा देऊन निसटशील; त्यांत तुझं कांहीं नुकसान नाहीं. पण माझ्या हातची मात्र ती कायमची जाईल. बहुतेक ती गेलेलीच आहे असं मला वाटूं लागलं आहे!

**अमृत**—अरे, थोड्या दिवसांचा खेळ आहे. "थोडी उरली कळ सोसावी". वारा जसा वेलीशीं कांहीं वेळ खेळून—

**विभाकर**—पण वाऱ्याच्या ह्या खेळांत वेल एखादे वेळेस झाडावरून खालीं पडते आणि मग त्या झाडाला जन्मभर विरह सोसावा लागतो—

**अमृत**—वेलीला त्या झाडावर चढवायला वाराच उपयोगी पडेल!

**विभाकर**—निसटलेल्या वेलीला पुन्हा त्या झाडावर चढवणं वाऱ्याला नेहमींच साधेल असं नाहीं.

**अमृत**—दाखल्यांच्या झगड्यांत तूं जिंकलंस, पण दाखल्यांचा हा खेळ सोडून देऊन तुला खरी खरी गोष्ट सांगतों ती कधीं विसरूं नकोस. विजयेशीं तुझं लग्न व्हावं अशी माझी मनापासून इच्छा आहे आणि तिचं मन तुला अनुकूल व्हावं म्हणून मधून मधून तिच्याशीं तुझ्याबद्दल बोलतहि असतों.

**विभाकर**--तिचं खरं मन काय आहे तें तुला ठाऊक असेल; मला कांहीं ती पत्ता लागूं देत नाहीं.

**अमृत**--कितीदां तुला सांगितलं कीं, तुझ्याबद्दल तिला फार आदर आहे पण पुनः पुन्हा तूं तेंच विचारतोस. तुझी होती नव्हती ती इस्टेट तूं गहाण

टाकली आहेस, घरांतले सर्व दागिने माझ्याकरितां विकून टाकले आहेस, हें तिला मीं सांगितलं आहे. तुझ्या गुप्त-दानाची आणि स्वार्थत्यागाची मीं तिला कल्पना करून दिली आहे. तुझी धिम्मी आणि धीरगंभीर वृत्ति, तुझा मोकळा आणि निगर्वी स्वभाव, गाजावाजा न करतां देशसेवा करण्याची तुझी पद्धति, यांमुळें तुझ्याबद्दल तिच्या मनांत फार आदर उत्पन्न झाला आहे—किंवा 'होता' असं म्हटलं पाहिजे; कारण अलीकडे नर्मदेच्या प्रकरणापासून तिच्या मनांत तुझ्याबद्दल विकल्प उत्पन्न झाला आहे. लोकांप्रमाणं तिलाहि वाटतं, कीं तिच्या गर्भाला तूंच कारणीभूत आहेस आणि म्हणून तिला तूं घरांत ठेवून घेतली आहेस. तिला मीं पुष्कळदां सांगितलं, कीं नर्मदेचा पहिलाच गुन्हा आहे आणि ती अगदीं निराधार आहे, म्हणून तूं उदार बुद्धीनें तिला आधार दिला आहेस; पण तिला हें खरं वाटत नाहीं. स्त्रियांचा स्वभाव मोठा संशयखोर असतो म्हणतात तें खोटं का?

**विभाकर**—चालायचंच. आपण चांगलं कांहीं न करतां एखादे वेळेस उगीचच श्रेय मिळतं, तसं वाईट कांहीं न करितां पापहि एखादे वेळेला अंगीं चिकटतं! जगाचा हा व्यवहार जाणणारा शहाणा मनुष्य--

( डॉ. **रोखीवाले** प्रवेश करतात. )

**रोखीवाले**—हॅलो! अमृतराव कसं काय आहे? डॉ. फाटक आणि मी मिळून तुमच्या केसचा आतां विचार केला आणि आम्हीं असं ठरवलं आहे कीं, शस्त्रक्रिया करणं अवश्य आहे आणि ती ताबडतोब केली पाहिजे. मेजर ऑपरेशन आहे तें. पण यशस्वी झालं तर दहा पंधरा दिवसांतच बरे व्हाल. नाहीं तर हात गेलाच म्हणून समजा. खर्च ५०० रुपये येईल. एकदम सांगून टाकतों. मी आपला स्पष्टवक्ता आहे. मग कसं काय?

**विभाकर**—तुम्ही तज्ज्ञ डॉक्टरांनीं ठरविल्यानंतर शस्त्रक्रिया केलीच पाहिजे. पण ५०० रुपये—

**रोखी०**—मग एखाद्या न्हाव्याकडे जा—तो कमी पैशांत करील—

**विभाकर**—मागचे ८००रु. कसे दिले हें ठाऊक आहे ना? माझ्याजवळ होतं नव्हतं तेवढं गहाण टाकलं आणि चंद्रिकाताईनं सगळे दागदागिने विकून—

**रोखी०**—सहज आपलं विचारतों. सांगायचं असेल तर सांगा—चंद्रिकाताईनं ही मदत कां केली? प्रेमशास्त्रावर मी एक पुस्तक लिहीत आहें,

हें तुम्हांला ठाऊक आहे. त्याकरितां आंकडेवारीनें तपशीलवार माहिती मिळवीत आहें. तुम्हांला असलेली माहिती तुम्ही दिलीत तर माझ्या माहितींत भर पडेल. विजयाताईनाहि मी विचारणार आहें या बाबतींत—असले प्रश्न विचारूं नयेत, पण पुस्तकांकरतां ही माहिती अवश्य आहे म्हणून—

**विभाकर**—माहिती दिली तर पैसे कांहीं कमी कराल का ?

**रोखी०** —छे. ती आशा नको. ५०० रुपयांत एक पै नाहीं कमी व्हायची.

**विभाकर**—एक वर्षांनीं मीं फेडले तर ?

**रोखी०** —आधीं २०० रुपये आणि शस्त्रक्रिया झाल्यावर ३०० मोजले पाहिजेत. चांद्रिकाताईजवळ किडूकमिडूक असेलच,—नाहीं म्हटलं तरी गरीब बायकांजवळ देखील थोडसं डबोलं असतंच असा माझा अनुभव आहे.

**अमृत** —आणि तें डबोलं त्यांच्याजवळ राहूं न देण्याचाहि पुष्कळ अनुभव तुम्हांला आहे—

**रोखी०** —आहे—तोहि अनुभव आहे ! त्यांत गैर असं मला कांहीं वाटत नाहीं. अहो, धंदा म्हणजे धंदा असं माझं तत्त्व आहे. धंदा करतांना औदार्याच्या फंदांत मनुष्यानं न पडलेलंच चांगलं असा माझा अनुभवहि आहे.

**विभाकर** —धंदा झाला तरी भावनांना कांहीं महत्त्व असतंच ना ?

**रोखी०** —युद्धांत बायकांना बरोबर नेणं आणि धंदा करतांना भावनांना डोकावूं देणं हें मी सारखंच घोक्याचं समजतों. पानपतच्या युद्धांत भाऊसाहेब कबिला घेऊन गेले आणि स्वतःचा आणि लोकांचा नाश करून घेतला; तसाच प्रकार धंदा करतांना भावनांना थारा देणाऱ्यांचा होतो. ( पाहून ) कोणी भेटायला येत आहे वाटतं ?

( **चंद्रिका, विजया, चक्रधर** प्रवेश करतात. )

**चंद्रिका** —( अमृतरावांच्या कॉटजवळ जाऊन ) आतां कसं काय वाटतं ?

**अमृत** —ठीक आहे, पण आणखी एकदां शस्त्रक्रिया आणि पुन्हा एकदां वर-दक्षणा म्हणून पांचशें रुपये—

**चंद्रिका** —मजजवळ आईच्या वेळचं किडूकमिडूक आहे तें मोडून १०० रुपये देईन ( डॉ० रोखीवाले मिस्कीलपणें विभाकरपंतांकडे पाहतात. )

**चक्रधर** —( चंद्रिकेस ) तूं म्हणत असलीस तर मीहि कांहीं देईन बाबासाहेबांना विचारून--

**रोखी०** —बरं आहे, मी जातों. पांच मिनिटांत परत येतों; तोंपर्यंत ठरवा काय तें. ( एकीकडे ) इथें प्रेमाची कांहीं तरी तिरंगी--चौरंगी गुंतागुंत दिसत आहे. ही गुंतागुंत जर समजली तर आपल्या पुस्तकाला फार उपयोगी पडेल ! [ जातो.

**विजया** —चंदू, तुझा बाई स्वार्थत्याग फार मोठा आहे. माझ्याच्यानं असा होईल कीं नाहीं शंका आहे.

**चंद्रिका** —न व्हायला काय झालं ? तशी परिस्थिति आली म्हणजे सगळं होतं.

**विजया** —खरं आहे. मला आईकडून १०० रुपये मिळालेले आहेत, ते द्यावेसे वाटताहेत.

**विभाकर** —उत्तम. पण, विजये, तुझ्याकडून आणखी एका स्वार्थत्यागाची अपेक्षा आहे. बाबासाहेबांकडे तूं जाऊन---

**विजया** —नाहीं बाई, मी नाहीं कधीं जायची. माझी प्रतिज्ञा ठाऊक आहे ना ?

**विभाकर**—अमृतरावांवर राजद्रोहाचा खटला चालला आहे आणि पिस्तुल लपविण्याचं वालंट आलं आहे, त्यांतून त्यांची सुटका व्हावयाची असेल तर ती बाबासाहेबांच्याच हुशारीनें आणि वजनानें होईल. कारण त्यांचं सरकार-दरबारांत वजन आहे. नागाच्या विषावर औषध म्हणजे त्याच्याच डोक्यावरचा मणी !

**विजया** —सगळं खरं आहे;-पण-मीं त्या दिवशीं प्रतिज्ञा केली आहे ना ?

**विभाकर** —अविचारानें केलेली प्रतिज्ञा सुविचारानें मोडावी लागते.

**विजया** —पण तो विचार मला पटला पाहिजे ना ?

**अमृत** --विभा, तूं कां रदबदली करतोस उगाच ? बाबासाहेबांनीं आधींच माझ्यावर फिर्याद केली आहे; आणि सरकारच्या आधीं तेच मला तुरुंग दाखवणार आहेत ! त्यांच्याकडे याचना करण्यांत अर्थ नाहीं. आणि

जायचंच झालं, तर विजया कशाला मधें? मानखंडना करून घ्यायला तिला आपण कशाला लावावं?

**चंद्रिका**—ती त्यांची मुलगी आहे म्हणून. बापाचा कठोरपणा आवडत्या मुलीपुढें नरम पडतो. रुद्र केवढा कोपिष्ट देव, पण सरस्वतीनं त्यालाहि आपल्या वाणीनं 'शिव'स्वरूप बनवून टाकलं.

**विजया**—इथं मात्र तूं घसरलीस. सरस्वती ही शंकराची मुलगी नसून सून आहे. आणि बाबांच्या मनांत आहे ते जर तूं केलंस, तर तुझ्या या दाखल्याप्रमाणं तुझंच ते ऐकतील.

**चंद्रिका**—विजू, माझ्याकरितां, विभाकरपंतांकरितां, तूं एवढं नाहीं का करणार?

**विजया**—तूं चांगली आहेस, हे अमृतराव चांगले आहेत आणि हेहि चांगले आहेत—असतील—पण मला कांहीं स्वाभिमान आहे का नाहीं?

**अमृत**—विजये, तुझं बरोबर आहे. माझं कांहींहि होवो, तुझ्या इच्छे-विरुद्ध तुला स्वाभिमान सोडायला मी कधींहि सांगणार नाहीं. माझं ऑपरेशन मुळीं करायचं नाहीं. माझं काय व्हायचं असेल तें होऊं दे, कोणाचेहि आतां उपकार नकोत. लोकांच्या उपकारांचं ओझं आतां मला सहन होत नाहीं. किती दिवस आपल्याकरितां लोकांना त्रास द्यायचा? बस्स. माझं ऑपरेशन करायचं नाहीं.

**विभाकर**—आम्ही करवणार!

**विजया**—तुमच्या मनांतला हेतु समजला. ऑपरेशनमधें बरंवाईट झालं, म्हणजे आयताच वाटेंतला कांटा—

**अमृत**—विजू—विजू! काय बोलतेस हें? तूं असं बोलावंस?

**विजया**—चुकलें मी. क्षमा करा. मीं असं बोलायला नको होतं.

( डॉ. **रोखीवाले** प्रवेश करतात. )

**रोखी०**—मग काय ठरलं?

**अमृत**—शस्त्रक्रिया करायची नाहीं.

**विभाकर**—करायची हो. पैशाबद्दल मी जबाबदार.

**चंद्रिका**—हे शंभर रुपये मीं आणले आहेत ते घ्या. बाकीच्यांची मागाहून व्यवस्था करूं.

**रोखी०**—'व्यवस्था करूं' हें कोरडं आश्वासन मला नको आहे.

**विभाकर**—माझ्यावर विश्वास नाहीं ?

**रोखी०**—कोणावरहि नाहीं. पैशाच्या आणि बायकांच्या बाबतींत कोणावरच विश्वास ठेवूं नये असं आमचं डॉक्टरांचं मत आहे. माझ्या पुस्तकांत—( पडद्यांत गडबड ) कोण आहे रे ती बाई ?

**नर्स चंपूताई**—( प्रवेशून ) बाळंतपणाची केस आहे.

**रोखी०**—नांव-गांव विचारून ये; आणि चंपूताई हे पहा. किती वेळ लागेल ? मी आतांच आलों पाहिजे का ? कोण जातीची आहे ?

**चंपू**—ब्राह्मण—आपली नर्मदा—

**रोखी०**—नर्मदा ? म्हणजे—( विभाकरकडे पाहून ) यांच्याकडे...... तीच का ? ( विभाकराकडे पाहून व थोडा वेळ थांबून ) मला तुम्ही मागून भेटाल का ? इच्छा असली तर माहिती सांगा; नाहीं तर सांगूं नका. सांगितलीत तर पुस्तकाला उपयोगी पडेल. ( चंपूताई आंत जाऊन थोड्या वेळांत परत येऊन सांगते 'आतांच एक दोन मिनिटांत आलं पाहिजे.')

**रोखी०**—नांव-गांव आणि बाकी सगळं विचारलं का ?

**चंपू**—ती सांगत नाहीं.

**रोखी०**—बावळी आहेस. मग केस हातीं घेत नाहीं म्हणून सांग, म्हणजे वाचा फुटेल. माझ्या पुस्तकाला ही माहिती फार उपयोगी पडेल. कोणाचं हें काम आहे हें सांगितल्याशिवाय मी येत नाहीं म्हणून सांग. ( आंत—ओरड होते. )

**चंपू**—प्राणान्तिक अवस्था आहे, आतांच गेलं पाहिजे.

**विभाकर**—तिचा प्राण चालला आहे आणि नांवासाठीं तुम्ही खोळंबून बसलां आहांत ! घ्या—माझं नांव घ्या. मी जबाबदार आहें. ( तिरस्कारानें डॉक्टरकडे पाहतो.)

**रोखी०**—थँक्स ! तुम्हांला मागून भेटेन. [ जातो.

**विजया**—अस्सं आहे एकंदरींत ! ( विभाकराकडे पाहत ) चांगले आहेत पराक्रम ! असले पराक्रम करून तुम्ही मला स्वार्थत्याग शिकवायला तयार !

**अमृत**—कांहीं तरी बोलतेस विजू तूं !

**विभाकर**--विजये, माझ्याबद्दल तुझं कसंहि मत असूं दे. सारं जग आधींच म्हणत आहे त्यांत तसं म्हणणारी एक व्यक्ति अधिक काय आणि कमी काय? चालायच्चंच. ( गंभीरपणें ) विजये, तुला हात जोडून या अमृतरावाकरितां एक विनंति करतों. माझ्याकडे पाहूं नकोस. या अमृतरावाकडे पहा आणि बाबासाहेबांच्याकडे जाऊन, कर्जाबद्दल आतांच निकड लावूं नका आणि यांच्या राजद्रोहाच्या खटल्यांत वकीलपत्र घ्या अशी त्यांना विनंति कर. माझं तुझ्यावर प्रेम आहे तें चुलींत गेलं असं समज. पण तुला जर अमृतरावाबद्दल कांहीं वाटत असेल, त्याच्या देशाभिमानाबद्दल व उदार चरिताबद्दल कांहीं आदर वाटत असेल, तर तुला अभिमान सोडून बाबासाहेबांकडे गेलं पाहिजे. तूं स्वतःला नवमतवादी समजतेस; तुम्ही नवमतवादी लोक समाजाहिताकरितां व्यक्तीचा बळी दिला पाहिजे असं पुष्कळ बोलतां; आतां समाजहिताकरितां व्यक्तीचा मिथ्या अभिमान सोडण्याचा प्रसंग आला आहे. मी स्वार्थत्यागी नाहीं म्हणून तूं मला कमी लेखतेस हें ठीकच आहे. पण तुझ्या हातून खोट्या अभिमानाचा त्याग झाला नाहीं, तर तुम्हां नवमतवादी म्हणविणाऱ्यांना--निदान तुला तरी, केवळ स्वतःचं सुख पाहायचं असतं, समाजाच्या हिताची जबाबदारी वाटत नाहीं, असं मला म्हणावं लागेल.

**चंद्रिका**— विजू, माझ्याकरितां एवढं नाहीं का करणार? असं काय बरं? ( अमृतरावांकडे पाहून ) यांच्याकरितां तरी—

**चक्रधर**— चंद्रिका म्हणत असली तर मी बाबांना जाऊन सांगतों आणि–

**चंद्रिका**--मी म्हणतें, विनवितें हात जोडून पाहिजे तर–पण भलती अपेक्षा करूं नको.

**चक्रधर**— पाहतों विचार करून!

**विभाकर**— विजये, तूं कांहींच बोलत नाहींस?

**विजया**— ( सचिंत होऊन ) आतां कांहीं सांगवत नाहीं. मी मोठ्या पेंचांत पडलें आहे. विचाराला जरा वेळ घेतला पाहिजे.

**अमृत**-- विभाकर, उगीच तिला भलती भीड कशाला घालतोस? माझं ऑपरेशनहि करवूं नका आणि खटला चालविण्याचीहि दगदग करूं नका! माझं व्हायचं असेल तें होऊं दे. माझ्याकरितां किती लोकांना भीड

घालायची ? आणि कितीकांचं उपकार घ्यायचे ? थंडीत उबाऱ्याकरितां रजया घ्याव्यात, पण त्या फार झाल्या म्हणजे जीव गुदमरतो, तसं माझं झालं आहे. बस्स, ठरलं; मला ऑपरेशन करायचं नाहीं. आणि खटलाहि पण चालवायचा नाहीं. मीच डॉक्टरांना जाऊन सांगतों. ( उठूं लागतो.)

विभाकर-- अरे हो हो, उठूं नकोस !

( चंपूताई प्रवेश करते. )

चंपू-- पेशंटला भेटायची वेळ आतां संपत आली. मंडळींनीं आतां निरोप घ्यायची तयारी करावी. [ जाते.

विभाकर— ऑपरेशनची आणि खटल्याची मी सगळी व्यवस्था करतों, बरं का. या वेळीं माझं ऐकलं पाहिजे.

अमृत-- काय वाटेल तें कर तूं, मला कांहीं सुचत नाहीं. तूं माझं ऐकणार आहेस थोडंच ?

विभाकर— ( चंद्रिकेस ) चंदू, जायच्या अगोदर अमृतरावांना एक गाणं ऐकवणार का ? विजये, तूं गाणं तरी म्हणणार का एखादं ?

अमृत —या वेळीं गाणं ऐकायला मिळालं तर जिवाला स्वस्थता वाटेल पण--

चंद्रिका —आज ऑपरेशन करायचं म्हणतां आणि गाणं कसं सुचतं तुम्हांला ?

अमृत --हंस मरायच्या आधीं गाणं म्हणतो म्हणतात; मी मरायच्या आधीं गाणं ऐकणार आहें.

चंद्रिका —अशा वेळीं असं बोलणं कसं सुचतं कोणास ठाऊक ?

अमृत —वर्तन शुद्ध आणि सरळ, तसंच मन निष्पाप नि निकोप असलं, कीं मृत्यूच्या दारांत देखील खुशाल झोंप घेतां येते, गाणं डोलत ऐकतां येतं आणि विनोद हौसेनें करतां येतो. हं चालूं दे--

चंद्रिका — पण शेजाऱ्यांना त्रास--

अमृत --नाहीं, त्रास नाहीं होणार. भेटण्याच्या वेळांत गाण्याची परवानगी असते.

(डॉ. रोखीवाले येतात.)

**रोखी०** —ऑपरेशन करायचं का नाहीं करायचं ?

**विभाकर** —करायचं ! या वेळेला कसाहि असला तरी डॉक्टर हा देव. 'वैद्यो नारायणो हरिः'.

**चंद्रिका** —इथं एखाददुसरं गाणं म्हणायला हरकत नाहीं ना डॉक्टर ?

**रोखी०** —खुशाल म्हणा ! (हसून) अर्थात् तुम्हांला गातां येत असेल आणि तुमचं गाणं पेशंटला आवडत असेल, तर ! बरं, जातों मी. (विभाकरपंताकडे वळून) पैशाची मात्र तयारी ठेवा, हं. [जातो.

**विभाकर** —ठीक ! सगळं करतों.

**अमृत** —म्हण.

**विभाकर** —म्हण–म्हण–

**चंद्रिका**—(पद म्हणते.)

**गडी**—(प्रवेश करून) आतां जायचा वखुत झाला, बरं का. आतां समद्यानीं उठावं. डॉक्टरांची परवानगी नाय आतां बसायला.

(मंडळी जायला उठतात, निरोप घेऊं लागतात. विजयेच्या व चंद्रिकेच्या डोळ्यांना पाणी येतें.)

[**पडदा पडतो.**]

---

## प्रवेश दुसरा

[**स्थळः**–रस्ता. **अंगार** व **चक्रधर** प्रवेश करतात. अंगारच्या हातांत एक लहान ट्रंक असते.]

**अंगार** —चक्रधरपंत, बरी गांठ पडली. चंद्रिकेचं आणि तुमचं लग्न जुळणार म्हणतात !

**चक्रधर** —नाहीं रे बाबा.

**अंगार** —अमृतरावांचा कांटा काढल्याशिवाय—

**चक्रधर** —पण तो निघणार कसा ?

**अंगार** —चक्रधर, माझ्या आणि तुमच्या वडिलांची इस्टेट अमृतरावांच्या वडिलांनीं गिळंकृत केली आणि हे अमृतराव आपल्या दोघांचा सत्यानाश करीत आहेत. तेव्हां सूड—

**चक्रधर** —सूडाची भाषा बोलूं नकोस. अमृतराव सज्जन मनुष्य आहे.

**अंगार** —बरं, 'सूड' म्हणून नाहीं, पण तुमच्या प्रेमाच्या आड येतो म्हणून त्याचा कांटा मीं जर दूर केला तर मला काय द्याल ?

**चक्रधर** —पण हें कसं करणार तूं ?

**अंगार** —कसं नि काय ! तुमचं काम झालं म्हणजे झालं ना ? अमृतरावांना तुरुंगांत डांबून ठेवला म्हणजे तर कांटा निघेल ना ?

**चक्रधर** —अमृतराव तुरुंगांत पडावेत अशी वाईट वासना मी मनांत धरीत नाहीं; पण अशा रीतीनें का होईना, काम झालं तर तेंहि मला चालेल.

**अंगार** —आतां कसं बोललेत !

**चक्रधर** —बरं आतां मी जातों, मागाहून बोलूं. [ जातो.

**अंगार** —( स्वगत ) कुठारला या बाजूनंच यायला सांगितलं होतं तो अजून कां येत नाहीं ! ( पाहतो ) हे कोण ? डॉक्टर रोखीवाले दिसताहेत.

( डॉ० रोखीवाले प्रवेश करतात )

**रोखीवाले** —काय अंगार, काय बातमी आहे ?

**अंगार** —तीन लग्नं ठरलीं आहेत—म्हणजे ठरल्याची बातमी आहे.

**रोखीवाले** —कोणकोणतीं ?

**अंगार**— अमृतराव आणि विजया हें एक.

**रोखी०**— अस्सं ! मला वाटलंच होतं. आणि दुसरं ?

**अंगार**— विभाकरपंत आणि—आणि—नर्मदा.

**रोखी०**— तें तर व्हायलाच पाहिजे होतं ! आणि तिसरं ?

**अंगार**— चक्रधरपंत आणि चंद्रिका.

**रोखी०**— काय —म्हणतोस काय ?

**अंगार**— ऐकतों असं; खरं खोटं कोणास ठाऊक !

**रोखी०**— आणि तुझं कोणाशीं ठरलं आहे ? बाकी तुला काय जरूर लग्नाची ? लग्नाशिवाय तुझे कारभार चाललेच आहेत !

**अंगार**-- हें काय डॉक्टरसाहेब !

**रोखी०**-- अरे, उगीच का तुला रोग झाला आहे ? आणि इंजेक्शन्स घेत आहेस ? बरं, अंगार, तूं त्या वेश्येचं प्रकरण सांगितलंस तें खरं आहे बरं का. कादंबरीपेक्षां अधिक मनोरंजक आहे तिचं चरित्र. माझ्या पुस्तकाला फार उपयोगीं पडेल. तिची सगळी हकीकत मीं या ( हातांतील प्रुफें दाखवून ) प्रकरणांत दिली आहे.

**अंगार**-- ही माहिती दिल्याबद्दल मला कांहीं--

**रोखी०**-- एक इंजेक्शन फुकट दिलं ना ? आणखी काय पाहिजे ? बरं जातों. [ जातो.

**अंगार**-- कवडीचुंबक आहे मोठा ! पण चोराच्या हातची लंगोटी म्हणतात ना, तेवढीच घेतली पाहिजे.

( **कुठार** प्रवेश करतो.)

**अंगार**--काय रे, उशीर लावलास यायला ? ही लहानशी ट्रंक तुझ्याकडे ठेवावयाची आहे. घेऊन जा आतां.

**कुठार**--ही ट्रंक माझ्याकडे कशाला ठेवीत आहेस ? तुला आपली खोली नाहीं का ?

**अंगार**--तसंच कांहीं तरी आहे, मग सांगेन.

**कुठार**--आणि काय रे, तुझ्या पाळतीवर डिटेक्टिव्ह आहेत म्हणतोस तें कां रे ?

**अंगार**--मागून सगळं सांगतों. तो पहा तिकडे एक डिटेक्टिव्हच दिसत आहे.

**कुठार**--कांहीं तरी लफडं आहे तुझं. कुणा बाईची ट्रंक चोरून आणली असशील, नाहीं तर--

**अंगार**--( हसून ) अरे, बाईचीच आहे; पण चोरून नाहीं. तिनंच मला ठेवायला दिली आहे.

**कुठार**--तुझ्यावर खूष दिसते आहे अगदीं ? आहे बुवा ! एक नर्मदा फसली, आतां ही दुसरी कोण ?

**अंगार**--तुला सांगण्याइतका मी मूर्ख नाहीं !

**कुठार** —मूर्ख नसशील; पण पक्का लुच्चा आहेस. लेका, अमृतरावांनीं आणि विभाकरपंतांनीं तुझ्यावर उपकार केले आणि त्यांच्याशीं तूं बेइमान झालास !

**अंगार** —अमृतरावांसारख्यांना फसवलंच पाहिजे. पिस्तुलं लपवून ठेवणाऱ्याशीं इमान कसलं आहे ?

**कुठार** —अमृतरावांवर उगाच बालंट आलं आहे तें. त्यांनीं पिस्तुलं लपविलीं आहेत असं म्हणणं म्हणजे तूंहि लपवलीं आहेस असं म्हणण्यासारखं आहे. ( अंगार दचकतो.) कां ? दचकलास कां ?

**अंगार** —भलताच आरोप केलास म्हणून ! मीं लपवून ठेवलीं आहेत असं म्हणणं म्हणजे महात्मा गांधींनीं लपवून ठेवलीं आहेत असं म्हणण्यासारखं आहे !

**कुठार** —बरं आहे महात्माजी, एक दोन रुपयांची गरज भागवाल का ?

**अंगार** —पैशाची भीक मजजवळ कशाला मागतोस ? मी काय कुबेर आहे ? आणि काय रे लेका ! पोशाकांत इष्कबाजी करून भटक्या कां मारीत असतोस ?

**कुठार** —(अंगारकडे बोट दाखवून) या गुरुदेव महात्माजींचंच अनुकरण करीत आहें मी !

**अंगार** —अस्सं !

**कुठार** —अरे, या वयांत चालायचंच. करीत आहे हें वाईट आहे हें समजतं; पण इलाज चालत नाहीं. तारुण्य मोठं वाईट ! बरं, पण, दोन रुपयांची गरज—

**अंगार** —माझीं कांहीं फिरकोळ कामं केलींस तर गरज भागवीन मी.

**कुठार** —पाहिजे तें काम करतों.

**अंगार** —मग लागतील तसे पैसे देतों. चल एक काम सांगायचं आहे. खोलींकडे चल. तिथें सांगतों.

**कुठार** —काय रे, अलीकडे डॉ. रोखीवाल्यांकडे कां रे जात येत असतोस ?

**अंगार** —अरे, ते कामशास्त्रावर एक पुस्तक लिहिणार आहेत, तेव्हां माझ्याकडून त्यांना कांहीं माहिती पाहिजे होती ?

**कुठार** —कसली माहिती ?

**अंगार** —नर्मदेबद्दल आणि—आणि चंद्रिकेबद्दल आणि विजयेबद्दल.

**कुठार** —त्यांच्याबद्दल ?

**अंगार**—हो, त्यांच्या प्रेमसंबंधाबद्दल. लोकांचीं प्रेमकारस्थानं जाणण्याची त्याला फार उत्सुकता दिसते !

**कुठार**—आणि हीं प्रेमकारस्थानं जाणणारा 'तज्ज्ञ' म्हणून तुला बोलावलं वाटतं ? पण काय रे, माहितीबद्दल कांहीं पैसे ?

**अंगार**—छट्. एक छदाम सुटायचा नाहीं त्याच्याकडून. औषधाचं आणि इंजेक्शनाचं त्यानें बिल पाठविलं आहे. पण माहिती पाहिजे असली तर इन्जेक्शनांचे पैसे मिळायचे नाहींत म्हणून मींहि सांगितलं आहे ! (पाहिल्यासारखें करून) तो पहा, एक साध्या पोषाखांत पोलीस दिसत आहे. माझ्या पाळतीवर आहे तो. चला, जाऊं या आतां. [ जातात.

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळः**—'सर' उद्धवरावांचा दिवाणखाना. **अमृतराव, विभाकर** प्रवेश करतात.]

**अमृत**—बाबासाहेब आहेत का घरांत ?

( **चक्रधर** प्रवेश करतो. )

**चक्रधर**—आहेत, आंघोळ करताहेत. बसा, आंघोळ झाल्यावर येतील. बसा इथं. कळवतों त्यांना. [ जातो.

**अमृत**—विभा, शस्त्रक्रिया होत असतांना किंवा आठ दिवस अंथरुणांत विव्हळत होतों तेव्हांच, मी मेलों असतों तर फार बरं झालं असतं; म्हणजे बाबासाहेबांकडे याचना करण्याचा प्रसंग टळला असता ! विभा, देशाकरितां जीव देण्यास मी तयार आहें; पण याचनेचे हे प्रसंग जिवावर येतात. 'याचना' म्हणजे 'यातना' यांत कांहीं शंका नाहीं !

**विभाकर** —पण देशाकरितां ही याचना केली पाहिजे. देशसेवा बिनघोर करतां यावी म्हणून चंद्रिकेवरचं प्रेम सोडलंस; तिनें तुझा नाद सोडावा म्हणून विजयेवर प्रेम करण्याचं नाटक केलंस; तसंच देशाकरितां हेंहि याचनेंच सोंग कर. तरवार घेऊन क्रूर हाडवैऱ्याशीं दोन हात केलेले पुरवले, पण निष्ठुर मनुष्यापुढें हात पसरणं नको, हें मला समजतं. पण देशाकरितां हें केलं पाहिजे. देव, देश आणि प्रेम यांकरितां द्रव्याचाच नव्हे, तर मानापमानाच्या जाणिवेचा देखील, त्याग करावा लागतो !

**अमृत** —मी हा त्याग करतोंच आहें; पण मरणप्राय वेदना होत आहेत.

**विभाकर** —वेदना सोसल्या पाहिजेत. देशाकरितां लढाईत अभिमानपूर्वक मरण पत्करण्यांत शौर्य आहे, तसंच गौणपणा पत्करून जीव वांचविण्यांतहि शौर्य आहे. अंधाराशीं दिवसभर झुंजून अस्तमानाला जाणारा सूर्य जसा वंदनीय आहे, तसाच ढगांमुळें तेजोभंग झाला असतांना दिनक्रम चालू ठेवणारा सूर्यहि आदरणीय नाहीं का ?

**अमृत** —पण चंद्रिकेची फसवणूक, विजयेशीं लपंडाव आणि तुझ्या मैत्रीचा भलता फायदा घेणं, हे माझ्या चारित्र्यावर जे ढग आले आहेत—

**विभाकर** —खरं बोलायचं म्हणजे या बाबतींत तुझं वर्तन गैर आहे. मीं कितीदां म्हटलं आहे कीं, तूं विस्तवाशीं खेळ खेळत आहेस; पण तूं ऐकलंच नाहींस, त्याला काय करायचं ? आणि अगदीं खरं बोलायचं म्हणजे तुला अगदीं स्पष्ट सांगतों कीं, आतां मला हें अगदीं असह्य होऊं लागलं आहे. तुझं कपटनाटक विजयेच्या नजरेस लवकरच आणावं म्हणतों. तुझे हेतु चांगले आहेत हें एक आणि गोष्टी भलत्या थराला जाणार नाहींत ही आशा, हें दुसरं; म्हणून मीं इतके दिवस गम खाल्ली. पण आतां यापुढें या बाबतींत मला गळ घालूं नकोस.

**अमृत** —थोडे दिवस वाट पहा. मग तुला काय वाटेल तें कर.

**विभाकर** —तुला याचनेचं जेवढं दुःख होत आहे तेवढं मला आत्मसंयमनाचं होत आहे. दुसऱ्याच्या घरीं येऊन भांडायचं नाहीं, म्हणून मी इथं भांडत नाहीं. पण हें काम झालं कीं, तुझ्या माझ्या दोस्तीचा सोक्षमोक्ष करून घेणार आहें.

**चक्रधर** — ( प्रवेशून ) बाबासाहेबांची आंघोळ झाली. ते आतां येतील. चंद्रिका काल भेटली होती ती आतांच बाबासाहेबांना भेटायला येणार आहे. कांहीं तरी महत्त्वाचं काम दिसतंयू ?

**विभाकर** —आहे थोडंसं.

**चक्रधर** —( हातानें खूण करून ) काय ?

**विभाकर** —समजेल—समजेल. ( चक्रधर जातो )

**अमृत** —आतां गप्प बसूं या—पुढं हवं तेवढं बोलूं, भांडूं, मारामारी करूं.

**विभाकर** —ठीक आहे. स्त्री-प्रेमापुढं मित्रप्रेम लंगडं पडतं हें पाहून मला फार वाईट वाटतं, पण भांडणाशिवाय गत्यंतर नाहीं असाच योगायोग दिसत आहे.

( **बाबासाहेब** व **चक्रधर** येतात.)

**उद्धव** —अमृतराव, कोणीकडे आलांत ?

**अमृत** —आपणांकडेच—याचना करण्याकरितां. पत्र पोंहोचलंच असेल. सगळं लिहिलं आहे त्यांत.

**उद्धव** —त्याला मीं उत्तरहि धाडलं आहे. काल पोहोंचलं नाहीं वाटतं ?

**अमृत** —नाहीं. काय लिहिलं आहे त्यांत ?

**उद्धव** —असं लिहिलं आहे कीं, तुमचं वकीलपत्र मी घेणार नाहीं; आणि कर्जाचे पैसेहि सुटणार नाहींत. दिवाणी फिर्याद केली आहे ती काढून घेण्याची माझी इच्छा नाहीं. पैसे कां सोडायचे ? तुम्ही ज्वलज्जहाल आम्हां प्रागतिकांकडून कर्ज काढून स्वतः स्वार्थत्यागी म्हणून मिरवतां आणि आम्हांला स्वार्थत्यागशून्य म्हणून शिव्या देतां ! बरं, कर्जफेडीकरितां फिर्याद केली, म्हणजे स्वार्थत्याग करण्याबद्दल आम्हांला विनंति करायची तुमची तयारीच. राजद्रोही भाषणं तुम्हीं करायचीं, त्यांत सरकारबरोबर आम्हां प्रागतिकांची नालस्ती करायची, आमची कुचेष्टा करून प्रतिष्ठा तुम्हीं मिळवायची, आणि सरकारनें फिर्याद केली म्हणजे पदरमोड करून तुमचे खटले चालवायला आणि कर्ज द्यायला आम्हांला विनवायचं ! तुम्हां ज्वलज्जहालांचा असा हा धंदा ! तुमचं वकीलपत्र घेऊन आम्हांला काय मिळणार ? नवीन वकिलाला नांव मिळवायचं असतं म्हणून तो मोफत काम करतो; माझं नांव

पुष्कळ झालं आहे, आतां त्याची जरूरी नाहीं. आणि कर्जफेडीबद्दलच्या दिवाणी फिर्यादीबद्दल म्हणाल, तर मला कांहीं सबब चालणार नाहीं.

**विभाकर**—कर्जफेड आम्ही करूंच. पण मुदत मिळावी अशी विनंति आहे.

**उद्धव**—मुदत कां द्यायची ?

**अमृत**—कारण कांहीं नाहीं; असलं तर एवढंच कीं, अनपेक्षित आणि विपरीत परिस्थितीमुळें हा प्रसंग ओढवला आहे. अनुकूलता आली म्हणजे तुमचे सगळे पैसे सव्याज फेडूं.

**उद्धव**—अनुकूलता केव्हां येणार ? तुम्ही या खटल्यांत आठ-दहा वर्षे कैदेंत जाणार असा रंग आहे. कैदखान्यांत गेल्यावर खोटीं नाणीं पाडून कर्जफेड करणार आहांत कीं काय ?

**अमृत**—आम्हांला जें सांगायचं होतं तें पत्रांत लिहिलं आहे. आतांहि विनवून सांगत आहें. सहानुभूति असली तर समजुतीला एक शब्द पुरतो, आणि नसली तर लाखों शब्द पालथ्या घागरीवरच्या पाण्यासारखे होतात. मला जें सांगायचं होतं तें लिहून आणि सांगून झालं आहे. सहानुभूतिपूर्वक विचार करावा अशी पुन्हा एकवार विनंति करतों. याउपर आपली मर्जी ! नशिबीं असेल तें भोगलं पाहिजे.

**उद्धव**—नशिबाला कां दोष देता ? आमच्या विजूशीं लग्न करण्याबद्दल चांगलं सुचवलं; तें नाकबूल केलंत. आणि आतां चंद्रिकेचं आणि या आमच्या चक्रधराचं लग्न व्हावं म्हणून खटपट करीत आहें त्यांत तुमचा बिब्बा !

**चक्रधर**—हो ! यांचा बिब्बा नाहीं तर काय ?

**अमृत**—मी बिब्बा घालतों ? मला तर तिच्याशीं लग्न करायचं नाहीं, हें तिला मीं निक्षून सांगितलं आहें. या विभाकराला विचारा पाहिजे तर !

**उद्धव**—उंदराला मांजर साक्ष ! मला सगळ्या गोष्टी ठाऊक आहेत. उगाच लपवा-लपवी कशाला करतां ? या विभाकरपंतांचं लक्ष विजूवर आहे, हें न समजायला मी काय लहान पोर आहें ? आणि ( अमृतरावांकडे पाहून ) तुमच्या मनाची ओढ विजूपेक्षां चंद्रिकेकडे अधिक आहे हें काय मीं ओळखलं नाहीं ?

**अमृत**—तिच्याशीं लग्न करण्याची माझी कांहीं इच्छा नाहीं याची तुम्हांला कशी खात्री पटवून देऊं ?

**उद्धव**— आमच्या विजूशीं लग्न करून ! तिचं तुमच्यावर प्रेम जडत चाललं आहे, हें मीं कांहीं दिवसांपूर्वींच ओळखलं होतं; आणि आतां तर आमच्या हिच्याकडून मला स्पष्टच कळलं आहे. विजूशीं मी कितीहि भांडलों तरी तिचं हित मला पाहिलंच पाहिजे. चंद्रिकेशीं लग्न करायचं नाहीं म्हणतां, विजूशीं गप्पा-गोष्टी करितां, तर मग तिच्याशीं लग्न करून कां घेत नाहीं ? तुमचं तरुणांचं मला आवडत नाहीं तें हेंच. सलगी करायची, मागाहून फसवणूक करायची, हे अलीकडच्या तरुणांचे धंदे ! तुम्ही तरी असं करूं नका. ( सौम्य स्वरांत ) पहा बुवा, विजूच्या लग्नाचं जमत असेल तर मी तिच्या काळजींतून मुक्त होईन. तुमचं आमचं नातं जमलं म्हणजे तुमचीं सारीं कामं मी करतों. कर्ज सोडतों, तुमच्याकरितां कोर्टांत भांडतों, अव्वलपासून अखेरपर्यंत सगळा खर्च करतों.

**चक्रधर**— काय, विभाकरपंत, ही योजना तुम्हांला कशी काय वाटते ?

**उद्धव**— ( विभाकरपंत कांहीं बोलण्याचा प्रयत्न करतो पण शब्द उमटत नाहींत हे पाहून) बोला ! बोला ! माझ्याशीं स्पष्ट बोलायला काय हरकत आहे !

**विभाकर**— अमृतरावांची परवानगी असली तर सगळं सांगतों. काय, अमृतराव—?

**अमृत**—चंद्रिकेनं चक्रधराशीं लग्न करावं कीं नाहीं हें मी कोण ठरवणार ? चंद्रिकेला विचारा.

**विभाकर**—अशी टाळाटाळी करून वेळ निभावून नेण्याची ही वेळ नाहीं. खरं आहे तें एकदां सगळं सांगून टाकलेलं बरं. चंद्रिकेच्याच लग्नाचं घ्या. या लग्नापासून तिचं किंवा चक्रधराचं हित होईल असं वाटतं का, बाबासाहेब, तुम्हांला ?

**उद्धव**—हो, दोघंजण वयानं अनुरूप आहेत. जातीची-गोत्राची वगैरे अडचण नाहीं. ग्रह आम्हांला पाहायचेच नाहींत. हा चक्रधर जरी माझा दूरचा नातलग असला तरी मुलासारखा मीं पाळलेला आहे. बुद्धीनें सामान्य असला तरी एम्. ए.पर्यंत शिकलेला आहे. स्वभावानंहि कांहीं वाईट नाहीं. त्याच्यांत नांव घेण्यासारखं कांहीं नसलं तरी नांव ठेवण्यासारखंहि त्याच्यांत कांहीं नाहीं. त्याला मी इतके पैसे ठेवणार आहे कीं, चंद्रिकेशीं लग्न केलं

तर तिचं जन्माचं कल्याण होईल; मग तिला मास्तरकी करण्याची जरूरी राहावयाची नाहीं.

**विभाकर**—पण तिची इच्छा आहे का नाहीं, हें पहायला नको का! तिचं प्रेम—

( डॉ० **रोखीवाले** प्रवेश करतात. )

**रोखी०** —तुमचं कांहीं खाजगी बोलणं तर चाललं नाहीं? चाललं असलं-तर जातों; तुमच्या त्या खटल्यांतील प्रेम-प्रकरणांतील माहिती मिळविण्या-करितां आलों होतों. घाई नाहीं, उद्यां माहिती दिली तरी चालेल.

**उद्धव** —खाजगीच बोलत आहोंत. हीं तरुण माणसं प्रेमाचे देव्हारे माजवतात आणि त्यांचे प्रश्न सोडवावे लागतात आपल्यासारख्या वृद्धांना!—( विभाकरपंतांकडे वळून ) प्रेम हा पदार्थ मी जाणतों. पण त्याला फाजील महत्त्व मात्र मी देत नाहीं. डॉ० रोखीवाल्यांचं आणि माझं या बाबतींत एक मत आहे. काय, डॉक्टर, प्रेमाबद्दल तुमचं काय मत आहे?

**रोखी०** —प्रेमाबद्दल माझं मत विचारान्तीं असं झालं आहे कीं, प्रेम हे पांखरासारखं आहे. पांखरूं केव्हां कोणत्या झाडावर बसेल आणि केव्हां तें तेथून उडेल याचा नेम नाहीं, तसंच प्रेमाचं आहे. लग्नाच्या बाबतींत मी प्रेमापेक्षां कर्तव्यनिष्ठेला आणि समजूतदारपणाला अधिक महत्त्व देतों. शिवाय सहवासानंतर सामान्यतः प्रेम उत्पन्न होतंच.

**उद्धव** —अगदीं बरोबर बोललेत.

**विभाकर** —मी विवाहानंतरच्या संभवनीय प्रेमापेक्षां, विवाहापूर्वीच्या निश्चित प्रेमाला अधिक महत्त्व देतों. कारण—

**रोखी०** —विवाहोत्तर प्रेम का प्रेमोत्तर विवाह हा शाळा-कॉलेजां-मधील मुलां-मुलींचा वाद आहे. आणि हा वाद करण्याकरितां कांहीं मी येथें आलों नाहीं. तुमचं खाजगी काम चाललं आहे, मी आपला जातों. [ जातो.

**अमृत** —बाबासाहेब, मला असं दिसतं आहे कीं, आपण दोन अटी घातलेल्या आहेत. एक चंद्रिकेचं चक्रधराशीं लग्न आणि दुसरी अट म्हणजे माझं विजयेशीं लग्न. या अटी आम्हीं मान्य केल्या नाहींत; तर तुम्ही राज-

द्रोहाच्या खटल्यांत मला कैदेंत जाऊं देणार आणि त्यांतून यदाकदाचित् सुटलों तर कर्ज-वसुलीकरितां दिवाणी तुरुंगांत टाकणार! काय, असंच ना ?

**उद्धव** —हो, अस्संच! चंद्रिका—

**अमृत** —ती पहा इकडे येत आहे. तिची इच्छा काय ती तिलाच विचारूं या.

( चंद्रिका प्रवेश करते. )

**उद्धव** —ये चंदू, तुला शंभर वर्षं आयुष्य आहे. ( चक्रधर तिला खुर्ची देऊं पाहतो, ती दुसरीकडे बसते. )

**चंद्रिका** —( उद्धवरावांस ) मी आपणांला एक विनंति करायला आलें आहें.

**उद्धव** —मला ठाऊक आहे ती विनंति. ती उच्चारायला न लावतां माझ्या स्वभावाप्रमाणं स्पष्टपणें मी उत्तर देतों कीं, आमच्या या चक्रधराशीं जर लग्न करीत असशील तर मागें तुला सांगितलं होतं त्याप्रमाणें तुझं थोडं-बहुत ऐकेन. लग्न केलंस तर तुला पैशाची ददात रहायची नाहीं. तयारी असेल तर बोल. चक्रधराशीं तुझं लग्न व्हावं अशी अमृतरावांचीहि पण इच्छा आहे. आतांच ते असं म्हणाले. होय ना, अमृतराव—

**अमृत** —हिच्याशीं लग्न करण्याची माझी इच्छा नाहीं हें मीं मागेंच सांगितलं आहें तिला. तिला वाटेल त्याच्याशीं—

**उद्धव** —मग काय, चंदू, तुझं काय म्हणणं ?

**चंद्रिका** —( काकुळतीनें ) बाबासाहेब, अशी अट घालूं नका! इच्छा नसतांना—

**उद्धव** —( तुटकपणें ) मग इच्छा नसतांना अमृतरावांना मीं सवलती काय म्हणून द्याव्यात ?

**चंद्रिका** —तुमची लग्नाची ही अट मान्य करण्यावांचून दुसरा मार्गच नाहीं का ?

**उद्धव** —नाहीं, मला तर दिसत नाहीं. काय, विभाकरपंत, तुम्ही कांहींच बोलत नाहीं ?

**विभाकर** —तुम्हीं भलत्या अटी घालून आम्हांला पेचांत पकडीत आहांत असं म्हणणं वाईट दिसेल, पण तें खरं आहे—

**उद्धव**—मग आपलं बोलणं इथेंच थांबवूं या. ( उठतो ) निरोप घेऊं ? माझं हें बोलणं वाईट दिसेल पण तें खरं आहे. तुमच्या शब्दांत उत्तर दिलं आहे !

**अमृत**—माझी सुटका व्हावी म्हणून असल्या अटी मी मान्य करणार नाहीं; आणि कोणीहि करूं नयेत—

**उद्धव**—मग मार्ग सुधारावा—

**अमृत**—हा सुधारला, चल विभाकर. (जाऊं लागतो, इतक्यांत **विजया** येते)

**विजया**—अमृतराव, तुम्हांला ही पुस्तकासारखी दिसणारी ऐटदार पेटी तुमच्या कोणा एका भक्तानें भेट म्हणून दिली आहे. तो मला वाटेंत भेटला; आणि भीत भीत मला म्हणाला, कीं, ही अमृतरावांना द्या. कोणाची ? कशाबद्दल ? हें त्याला विचारलं तेव्हां तो म्हणाला, कीं अमृतरावांच्या देशाभिमानाबद्दल आणि स्वार्थत्यागाबद्दल कांहीं भक्तांना आदर वाटत आहे, तो व्यक्त करण्याकरितां ही पेटी तयार करून घेतली आहे आणि ती त्यांना द्यायची आहे.

**चक्रधर**—मग त्यानें स्वतःच कां नाहीं आणून दिली ?

**विजया**—तुम्ही समक्षच कां देत नाहीं म्हणून विचारलं तेव्हां तो म्हणाला कीं, सरकारांत आमचं नांव जाईल अशी भीति वाटते म्हणून आमच्याकरितां तुम्हीच द्या. तुम्ही दोघेही इकडे आलांत हें त्याच्याकडूनच कळलं.

**विभाकर**—असेल कोणी सरकारी नोकरींतला देशभक्त ! असे पुष्कळ असतात !

**उद्धव**—कोणी का असेना, पांच-दहा रुपयांची पेटी अमृतरावांना मिळाली हें ठीक झालं.

**विजया**—बाबा, तुम्हीदेखील या पेटीची किंमत रुपये–आणे–पै–मध्यें करतां? सुदाम्यानें प्रेमानं कृष्णाला दिलेल्या पोह्यांची किंमत तुम्ही बहुधा एक-दोनं पैसेच केली असतीत, बाबा ! प्रेमानें आणि आदरानें दिलेल्या असल्या पेटींत काय सांठवलेलं असतं याची तुम्हांला कल्पना तरी आहे का ?

**चक्रधर**—या पेटींत बहुधा, लिफाफे, नोटपेपर्स, नाहीं तर लवंगा-वेलदोडे असतील, दुसरं काय ?

**विभाकर**--( विजयेस ) पाहूं तर द्या पेटी. ( पेटी पाहून ) विकायला काढली तर बाजारांत या पेटीची पांच-दहा रुपयांपेक्षां जास्त किंमत येणार नाहीं पण सहृदय माणसाच्या दृष्टीला यांत देशभक्ताबद्दल देशभक्तांना वाटणारा उत्कट आदर आणि निर्मळ भक्ति दिसेल. तरुणाला तरुणीच्या डोळ्यांत निष्पाप प्रेम आणि सात्त्विक आनंद दिसतो; पंढरीच्या वारकऱ्यांना विठोबाच्या सांवळ्या मूर्तींत निस्सीम पावित्र्य आणि वात्सल्य दिसतं; टेनिसन कवीला भींतीच्या एका फटींतल्या एका लहान फुलांत देव दिसल्याचा भास झाला; वर्डस्वर्थला बालकाच्या मुखांभोंवतीं स्वर्गीय वलय दिसलं; शिवरामपंत परांजप्यांना महाराष्ट्रांतल्या किल्ल्यावरच्या दगडांना वाचा फुटलेली दिसली; अर्जुनाला कृष्णाच्या मुखांत विश्वरूपदर्शन झालं; त्याप्रमाणंच देशभक्तांनीं देशभक्ताला नजर केलेल्या या पेटींत--ज्यांना ती दृष्टि आलेली आहे त्यांना--सत्त्वशील लोकांची मुकी भक्ति दिसेल !

**उद्धव** --मलाहि तुमच्या या बोलण्यांत वेडगळ कवि-कल्पनांच्या भरमसाट भराऱ्या दिसत आहेत. मला अर्जुनाची ती दिव्य दृष्टि नाहीं, आणि या पेटींत कुठें तरी लपून राहिलेल्या तुमच्या त्या आध्यात्मिक मौल्यवान वस्तु माझ्या चर्मचक्षूंना दिसत नाहींत !

**चक्रधर** --मला दिसतात का पाहतों. ( पेटी विभाकरपंतांपासून घेऊन उघडून पाहत ) या कप्प्यांत कागद-पेन्सिली आणि यांत लवंगा-वेलदोडे दिसत आहेत. ( अमृतरावांस ) अमृतराव, ही घ्या आपली पेटी !–तुम्हांला अर्पण केलेली आहे. ज्याची त्याला दिलेली बरी ! ( अमृतरावांस पेटी देतो. )

**विजया** --बाबा, लोकांना अमृतरावांबद्दल किती आदर आहे आणि ते संकटांतून मुक्त व्हावेत म्हणून किती तळमळ लागली आहे ती तुम्हांला समजत असून समजत नाहीं असं कां बरं ढोंग करतां ? त्यांच्या उज्ज्वल देशभक्तीकडे पहायचं नसेल, लोकांच्या उत्कट आदराकडे पहायचं नसेल, तर माझ्याकडे पाहून तरी त्यांचं कर्ज माफ करा. आणि त्यांचा खटला चालवायचं कबूल करा.

**उद्धव** --कर्ज माफ करायला आणि खटला चालवायला हीं मला पुरेशीं कारणं वाटत नाहींत. तशीं सबळ कारणं दाखव म्हणजे विचार करीन.

**विजया** --बाबा, मी तुमची मुलगी ना ? माझं नाहीं का ऐकायचं ?

**उद्धव** —नाहीं. तूं माझं-

**विजया** —आईनें असं 'नाहीं' म्हटलं असतं का? आई ती आई आणि वडील ते वडील, असं म्हणतात तेंच खरं. बाबा, नका हो असे निष्ठुर होऊं. मी किती मानी आहें हें तुम्हाला ठाऊक आहे. तुमच्याकडे याचना करायला यायची नाहीं अशी प्रतिज्ञा करून मी घराबाहेर पडलें होतें. ती मी सुद्धां–नाक मुठींत धरून पदर पसरून याचना करीत आहें, याचं तुम्हांला कांहींच नाहीं का वाटत? पुरुष कठोर खरेच—

**उद्धव** —मी पुरुष असलों तरी कठोर नाहीं; पण तुम्ही माझं ऐकत नाहीं म्हणून मला कठोरपणा स्वीकारावा लागतो.

**विजया** —मी ऐकतें. आतांपासून मी तुमच्या सांगण्याबाहेर जाणार नाहीं.

**उद्धव** —मग या अमृतरावाशीं आणि विभाकरांशीं बोलणं-चालणं बंद कर, नाहीं तर—

**विजया** —( हंसून ) पण अमृतरावांशीं लग्न केलं तरी देखील बोलूं नको?

**उद्धव**— हें लग्न ठरत असलं तर मग बोलणं नाहीं—( हंसून )–म्हणजे माझं बोलणं नाहीं. तूं त्यांच्याशीं हवी तेवढी बोल! पण ते तयार आहेत का? ( अमृतरावास ) काय हो?

**अमृत** —मला आतां उत्तर देतां येणार नाहीं.

**उद्धव** —(रागानें) पण मला उत्तर देतां येतं कीं, तुमची आणि विजयेची विनंति अमान्य!

**विजया** —अमृतराव–तुम्हांला आतां उत्तर कां बरं देतां येत नाहीं? लाजण्यांत काय अर्थ आहे? सत्य लाजत नाहीं.

**अमृत** —मला लाज वाटत नाहीं—शरम वाटत आहे.

**विजया**— म्हणजे याचा अर्थ काय समजायचा? इतके दिवस मला फसवीत होतां असं का समजायचं!

**उद्धव**— विभाकरपंत, तुमचे मित्र लाजत असतील तर तुम्ही बोला. तुम्ही त्यांचे जानी दोस्त आहांत म्हणून म्हणतों. तुम्हांस स्पष्ट बोलायचं नसेल तर तुमचं-आमचं पटायचं नाहीं. मला पुष्कळ कामं आहेत. प्रश्नाचं उत्तर लवकर द्या.

**विभाकर**—मला आपल्या प्रश्नाचं उत्तर आतांच देतां येणार नाहीं. पण इतक्या तडकाफडकीं अमृतरावांनीं या प्रश्नाचं उत्तर दिलं पाहिजे असा आग्रह धरण्याचं कारण काय? इतकी घाई काय आहे?

**विजया**—अमृतरावांनीं उत्तर देण्यांत घाई करूं नये असं म्हणण्यांत तुमच्या मनांतला स्वार्थी हेतु काय आहे हें न समजण्याइतकी दूधखुळी मी नाहीं.

**विभाकर**—पण अमृतरावांचा निःस्वार्थी हेतु न समजण्याइतकी तूं दूधखुळी आहेस हें निश्चित! या प्रश्नाचा घाईत निकाल लावण्यापूर्वी—

**विजया**—तुमचं पोक्तपणाचं पोकळ सोंग आतां पुरे करा—

**विभाकर**—सोंग मी करीत आहें का दुसरं कोणी तरी करीत आहे—( थांबून ) पण तें जाऊं द्या. चंद्रिका इथेंच आहे तिची इच्छा काय आहे हें आधीं तिला विचारूं या.

**चक्रधर**—माझी तयारी आहे. अमृतराव, तुमची हरकत नाहीं ना?

**अमृत**—मला कांहीं समजत नाहीं. मला कांहीं बोलतां येत नाहीं. माझं डोकं फिरूं लागलं आहे. मी किंकर्तव्यता-मूढ झालों आहें.

**विजया**—( रागानें ) किंकर्तव्यतामूढ झालां नाहींत, खरोखरीच मूढ झालां आहांत—नव्हे, लुच्चे आहांत.

**अमृत**—मीं तुला लग्नाचं कधीं वचन दिलं होतं? गोष्ट तरी काढली होती?

**विजया**—वचन दिलं नव्हतं; पण आपल्या वारंवार येण्याजाण्याचा अर्थ काय होता?

**अमृत**—मला सांगतां येणार नाहीं. तो या विभाकराला माहीत आहे.

**विजया**—काय हो, मित्रराज, काय अर्थ?

**चक्रधर**—काय हो, मित्रवर्य, काय अर्थ?

**विभाकर**—स्पष्टपणें सांगायचं म्हणजे— काय अमृतराव, सांगूं का आतां तरी—?

**विजया**—त्यांना काय विचारतां? तुम्ही न सांगतां देखील तुमचीं मनं मला समजतात.

**विभाकर**—बरोबर समजत असतीं तर असं लागून बोलली नसतीस.

**विजया** —अमृतराव– तुम्ही असं मला फसविणार म्हणतां ! ठीक आहे. मला माझ्या बुद्धीचा मोठा अभिमान होता कीं, कोणाहि पुरुषाला मी फसणार नाहीं. मी चांगली शिकलेली आणि स्वतंत्र विचाराची असून मी फसलें; तर मग इतर बायका पुरुषांना फसत असतील यांत नवल काय? स्त्रिया या फसण्याकरितां आणि पुरुष हे फसविण्याकरितांच जन्मले आहेत हेंच खरं.

**उद्धव** —तुला पहिल्यापासून हेंच सांगत होतों. विस्तव केव्हां दगा देईल याचा नेम नसतो. गवताच्या काडीनें त्याच्याशीं खेळ खेळूं नयेत. पण आमचं म्हणणं ऐकलं नाहींस. आतां तरी सावध हो, आणि संबंध सोड.

**विजया** —संबंध सोडतें. पण यांच्या देशाभिमानाकडे पाहून आणि त्यांच्यावरचं संकट पाहून मन पुन्हा असं सांगतं कीं, जरी त्यांनीं कितीहि मला फसवलं असलं तरी त्यांना या प्रसंगांतून वांचविलं पाहिजे.

**उद्धव** —मी तुझ्यासारखा फसून पुन्हा गळीं पडण्याइतका मूर्ख नाहीं. अमृतराव, विभाकरपंत, शुष्क वाटाघाटी आतां पुरे झाल्या नाहींत का? ( चंद्रिकेकडे वळून ) चंदू, तुझं अनुकूल उत्तर असलं तर तूं जरा थांब. नाहीं तर यांच्याबरोबर तूंहि निरोप घे.

**चंद्रिका** —यांना कर्जमुक्त करण्याकरितां— राजद्रोहाच्या खटल्यांतून सोडवण्याकरितां– मी पाहिजे तें करण्यास तयार आहें. पण विशेष प्रेम नसतांना—

**उद्धव** —आधीं प्रेम नसलं तरी पुढें लग्न केल्यावर प्रेम उत्पन्न होतं. बायकांना मूल झालं म्हणजे मुलाकरितां दूध, आणि पतीकरितां प्रेम, उत्पन्न होतं.

**चंद्रिका** —अमृतराव, मी काय उत्तर देऊं?

**अमृत** —नाहीं म्हणून सांग. माझ्याकरितां हा त्याग नको. तूं आपल्या मनाला विचार आणि तुझ्या स्वतःच्या दृष्टीनें इष्ट वाटेल तेंच कर. मला वांचविण्याकरितां तुला न आवडणारं लग्न तूं केलंस तर माझा देह वांचेल पण माझा आत्मा तळमळत राहील. तूं आपल्या मनालाच कौल लाव.

( पोलिसांसह **पोलीस अम्मलदार** येतो. **अंगार** बरोबर असतो. )

**अम्मलदार** —झडतीकरितां आलों आहें. अमृतराव कोण? त्यांची अगोदर झडती घ्यायची आहे.

**अंगार** --हे अमृतराव--

**अम्मलदार** --आणि विभाकरपंत ? विजयाबाई ?

**अंगार** --हे विभाकरपंत आणि या विजयाबाई.

**अम्मल०** --तुमची सर्वांची झडती घ्यायची आहे. इथून हलूं नका.

**अमृत** --झडती-वारंट असलं तर तें पाहूं द्या--

**अम्मल०** --हें पहा--

**अमृत** --( झडती-वारंट पाहून ) घ्या झडती; काय काय पहावयाचं आहे ?

**अम्मल०** --तुमच्या हातांतील ती पेटी पाहूं आधीं. ( अम्मलदार पेटी घेतो. फौजदार पेटी उघडण्यास सांगतो. )

**चक्रधर** --त्यांत काय सांपडणार आहे ? त्यांत कोरे नोट पेपर्स, पेन्सिली, वगैरे आहे.

**फौजदार** --( पेटी उलथी-पालथी करून सारे कप्पे पाहून आनंदानें ) सापडलं, हें पहा ! चोर-कप्प्यांत पिस्तूल ! चांगले देशभक्त आहात अमृतराव-

**अम्मलदार** --कोणाची ही पेटी ?

**विभाकर** --माझी ! मी या पेटीबिद्दल जबाबदार आहें. अमृतरावांच्या केवळ हातांत होती एवढेंच ! मीं ती त्यांच्या हातांत दिली.

**चक्रधर** --मी--

**विभाकर** --साहेब, ती माझी पेटी आहे. या अमृतरावांजवळ पहायला दिली होती. त्यांचा त्यांत कांहीं एक संबंध नाहीं. ते बिचारे आजारी, हात दुखावलेला आहे त्यांचा. त्यांना पिस्तुलाचा काय उपयोग ? आणि या विजयेला पिस्तूल कशाशीं खातात हेंहि ठाऊक नाहीं. मी या सगळ्याला जबाबदार आहें.

**अम्मल** --तुम्हां दोघांना सध्यां अटक करतों. मागाहून वाटल्यास ( विजयेकडे पाहून ) यांना अटक करूं.

( फौजदार पंचनामा लिहून अम्मलदारांच्या हातांत देतो. अम्मलदार नों पाहून व उद्धवरावांकडे पाहून ) या पंचनाम्यावर सही करावी. ( उद्धवराव पंचनाम्यावर सही करतात. ) बरं आहे. आम्ही जातों. सलाम. ( अमृतराव व विभाकरपंतास ) चला. ( जाऊं लागतात. )

**चंद्रिका**--हे जामिनावर सुटणार नाहींत का ?

**अंम्मलदार**—हो. सुटतील कदाचित्. पहा अर्ज करून—

**चंद्रिका**—बाबासाहेब—

**उद्धव**—आतां कांहीं बोलूं नकोस. मागाहून सगळं पाहतों. (अमलदार दोघांना घेऊन जातात. ते गेल्यावर विजयेस—) विजू, विभाकराचा स्वार्थत्याग तुझ्या ध्यानांत आला का? अमृतरावांना वांचविण्याकरितां पिस्तुलाची जबाबदारी त्यानें आपल्या अंगावर घेण्याचा प्रयत्न केला. कायद्यांत हें कांहीं चालेल असं वाटत नाहीं. पण विभाकरपंतानें मित्रप्रेमानें प्रयत्न करून पाहिला एवढंच.

**विजया**—ते इतके चांगले असतील असं मला वाटलं नव्हतं.

**उद्धव**—विभाकरपंत फार सज्जन आहेत. अमृतरावहि तसेच आहेत; पण—पुढं बोलूं. विजू, किती दिवसांनीं तूं येते आहेस! चल घरांत. चंदू, तूं पण चल. अशी रडूं नकोस. मी सगळी कांहीं बरोबर व्यवस्था करतों. चल.

## — अंक तिसरा समाप्त —

# अंक चवथा



[ **स्थळ**--एक सार्वजनिक बाग. **अंगार** प्रवेश करतो.]

**अंगार** --कांहीं म्हणा, नवमतवादी विजया नीतिमत्तेच्या रूढ कल्पनांची चेष्टा करते तें फटकळपणाचं दिसतं; पण तिचीं मतं खरीं आहेत. तिनें माझ्या स्वभावांत क्रांति घडवून आणली आहे बुवा! कसली नीतिमत्ता आणि कसलं काय? शिष्ट लोकांच्या कल्पनेचे चोचले आहेत ते! पण ती पोरटी स्वतः त्या रूढ नीतीला चिकटून आहे--म्हणजे दिसते तरी तशी! बोरं वरून किती चांगलीं दिसलीं तरी त्यांत बहुधा कीड असायचीच, म्हणा! ( पाहून ) हा आमचा दोस्त कुठार आला वाटतं! ( **कुठार** येतो. ) परवां उत्तम काम केलंस दोस्त! कोणी ओळखलं नाहीं ना तुला!

**कुठार** --स्त्रियांचं मन किंवा-( डोळे मिचकावून ) तुझं मन एखाद वेळेस ओळखेल, पण मी पोषाक बदलून कोठें गेलों म्हणजे माझं खरं रूप कोणालाच ओळखणं शक्य नाहीं. पण, काय रे, विभाकरपंतांनीं घालवून दिल्यापासून (किंवा ती नोकरी तूं सोडल्यापासून म्हणतों पाहिजे तर) तूं काय उद्योग करीत असतोस रे? मला तर लेका असं दिसतंय् कीं, तूं कोणा तरी बाईला जाळ्यांत पकडून चैन करीत आहेस! कोणाला गोत्यांत आणणार आहेस? अरे, बायकांना फसवणं--

**अंगार** --त्यांत काय वाईट आहे! नीति-अनीतीच्या कल्पना सांकेतिक आहेत.

**कुठार** --विजया सांकेतिक म्हणते, तूंहि तेंच म्हणतोस! सांकेतिक म्हणजे काय रे लेका!

**अंगार** --अरे, सांकेतिक म्हणजे काल्पनिकच.

**कुठार** --अस्सं! मला वाटलं दुसरंच कांहीं तरी! ती विजया मोठी हुशार आहे बरं का? काय बोलते! काय लिहिते! ती बोलते आणि लिहिते तें दिसण्यांत वाईट दिसतं, पण खरं असतं. आपण बुवा तिच्या मताचे होऊं

लागलों आहोंत. तूं तर तिच्याभोंवतीं प्रदक्षिणा घालणारा तिचा भक्तच आहेस. देवीची भक्ति कितपत सफळ झाली आहे ?

**अंगार** —चूप. बोलूं नकोस, कोणी ऐकेल. मी डिटेक्टिव्ह आहें, पण आज-काल माझ्यावरहि सरकारनें डिटेक्टिव्ह ठेवले आहेत. मी डिटेक्टिव्ह खात्यांत शिरलों आहें, पण हें कोणा कोणासहि सांगू नकोस हो ! तूं मघांशीं विचारलंस म्हणून तुला सांगितलं इतकंच ! दोस्त ! आज एक काम केलं पाहिजे माझ्याकरितां.

**कुठार** —काम केलं तर काय देणार ?

**अंगार** —बालगंधर्वांच्या नाटकाला नेईन ! काम असं आहे कीं, आज अमृतरावांवरच्या दोन्ही खटल्यांचा निकाल आहे. कोर्टांत जाऊन मला निकाल सांगायला इथं येशील का ?

**कुठार** —या निकालाशीं तुला काय करायचं आहे ? अमृतराव तुरुंगांत जावा आणि विजया तुला मिळावी–

**अंगार** —शुः शुः ! बोलूं नयेत असल्या गोष्टी.

**कुठार** —बोलूं नयेत, कराव्यात, असं तुझं मत दिसतंय् ! 'शब्द नकोत, कृति पाहिजे' असं परवां महात्मा गांधी म्हणाले होते आपल्या व्याख्यानांत; आपण त्यांचे अनुयायी झालां आहांत वाटतं !

**अंगार** —नाहीं, झालों नाहीं अजून. बाकी नीला नागिणीचं चरित्र ऐकल्यापासून गांधींच्या कळपांत जावं असं वाटूं लागलंय् !

**कुठार** —चांगलं आहे ! आमच्या कोंकणांतून येणाऱ्या आगबोटींतल्या-पेक्षांही तुझ्या डोक्यांत अधिक घाण भरलेली आहे. नीति-अनीति कांहीं—

**अंगार** —अरे ! अजून नीति-अनीति हे शब्द तूं उच्चारीत आहेसच ! विजयेच्या गोष्टी आणि तिचे लेख वाचून अजून तुला नवमतवाद समजला नाहीं ? बरं, जा आतां. ( कुठार जाऊं लागतो ) अरे, पण इकडे ये. तुझ्या-जवळ ठेवलेली वस्तु जपून ठेवली आहेस ना ?

**कुठार** —हो ! पलंगाखालच्या ट्रंकेंत ठेवली आहे. काळ्या ट्रंकेंत नाहीं बरं का—पिवळ्या—!

**अंगार** —अरे, असल्या गोष्टी मोठ्यानें बोलूं नयेत. माझ्यावर डिटेक्टिव्ह ठेवले आहेत, सांगितलं ना ?

**कुठार** --कां ठेवले आहेत रे?

**अंगार** —तें एक रामायण आहे मोठं. सांगेन मग केव्हां तरी, जा आतां.

**कुठार** --माझ्या खोलीच्या आणि ट्रंकेच्या किल्लया तुझ्याजवळ आहेतच.

**अंगार** —तुझ्या डोक्याच्याहि आहेत!

**कुठार** —मजजवळ तुझ्या डोक्याच्या नाहींत, कारण तुला डोकंच नाहीं!

**अंगार** --पुरे तुझ्या उष्ट्या कोट्या, जा आतां. (कुठार जातो.) अमृतराव आणि विभाकरपंत हे लेकाचे चांगलेच सांपडले आहेत आपल्या जाळ्यांत! आतां दुसरी पेटी कुठारच्या खोलींत ठेवली आहे तिचा असाच काहीं तरी उपयोग केला पाहिजे. तिथपर्यंत डिटेक्टिव्हांना पत्ता लागला तर ते कुठारला पकडतील; आपण नामानिराळे आहोंतच! असल्या वस्तु जवळ बाळगूं नयेत. अस्तनींतला विस्तव आहे तो; त्याच्याशीं खेळ उपयोगाचा नाहीं. त्यातून डिटेक्टिव्ह खातं बडं हुशार आणि वस्ताद आहे. त्याच्याशीं आपली लुच्चेगिरी फार दिवस चालायची नाहीं. तें खातं हुशार आणि वस्ताद आहे, तर आपण काय कमी आहोंत काय? पाहून घेऊं. (विचार करून) आपली चटकचांदणी विजया याच सुमारास चंद्रिकेला घेऊन इकडे फिरावयाला येत असते. ती अजून कां बरं आली नाहीं?–त्या दोघींना जाळ्यांत अडकवीन तेव्हाच हें डोकं खरं असं मी म्हणेन. (पाहून) आल्याच वाटतं त्या जरा लांब जाऊन बसावं आणि मग शिष्टपणानं, जणूं काय, सहजगत्या गांठ पडली, असं दाखवावं. (बाजूस जातो. **विजया** व **चंद्रिका** प्रवेश करतात.)

**विजया** --ही बाग अलीकडे चांगली झाली आहे फिरायला यायला, नाहीं ग चंदू?

**चंद्रिका** -- मला नाहीं बाई अशा बागेंत हिंडणं आवडत. पाहिजे ते लाक येतात, त्यांच्या नजरा वाईट असतात. तो मेला अंगार, तो कुठार—

**विजया** —आपल्या बायकांच्या नजरा मोठ्या शुद्ध असतात नाहीं?

**चंद्रिका** —तुझं आपलं कांहीं तरी बोलणं!

**विजया** –मी खरं आहे तें बोलतें. बाकी, चंदू, खरं आहे तें देखील बोलूं नये असं मला देखील अलीकडे पटूं लागलं आहे. सामान्य लोकांवर त्याचा अगदीं

वाईट परिणाम होतो. माझं बोलणं ऐकून नर्मदा बिघडली हें त्याचं धडधडीत उदाहारण आहे. दुसरींहि कांहीं माणसं माझ्या लेखांनीं बिघडलीं आहेत असं विभाकरपंत सांगतात. तें ऐकल्यापासून काळ, वेळ, स्थळ, पाहिल्याशिवाय 'सत्य' देखील बोलूं नये हें पटूं लागलं आहे मला. आणि एखाद वेळेला उगीच वादाकरितां बोलतों ते लोकांना खरंच वाटतं; उगीच हसविण्याकरितां आपण कोटी करितों, ती एखाद्याच्या हृदयाला शल्याप्रमाणं बोंचते.

**चंद्रिका** —तुला हें पटूं लागलं हें उत्तम झालं. विभाकरपंतांच्या बोलण्याचा परिणाम दिसतोय् हा!

**विजया** —हो! तेंहि थोडंसं खरं आहे. त्यांच्या बोलण्याकडे मी पूर्वी लक्ष देत नसें तें माझं चुकलं. त्यांच्या थोरपणाची आणि स्वार्थत्यागाची त्या वेळीं मला चांगली कल्पना नव्हती. नर्मदा अनाथ आहे, तिचा आश्रय तुटला तर ती बहकेल, म्हणून आपल्यावर भलता आळ येत असला तरी त्यांनीं तिला ठेवून घेतली, हें आतां मला पटूं लागलं आहे.

**चंद्रिका**— आतां विशेष काय झालं आहे पटायला?

**विजया**— अमृतरावांकरितां त्यांनीं केवढा स्वार्थत्याग केला आहे हें सगळं आतां मला कळलं आहे. आणि त्या दिवशीं पिस्तुलाची सर्व जबाबदारी आपल्या शिरावर घेऊन अमृतरावांना आणि मला वांचविण्याचा प्रयत्न केला, हा त्यांच्या मनाचा केवळ थोरपणा!

**चंद्रिका**— त्यांचं तुझ्यावर पहिल्यापासूनच प्रेम आहे आणि, विजू, तूंहि त्यांच्यावर जडूं लागलं असं दिसतंय्! बाकी हें मी दहा-पंधरा दिवसांपूर्वींच ओळखलं होतं!

**विजया**— कसं ग?

**चंद्रिका**— शरीरांत काय आहे, हें ओळखण्याकरितां 'रॉन्टजेन'नें 'क्ष'-किरणं शोधून काढण्यापूर्वींच लोकांच्या मनांत काय आहे हें ओळखण्याचीं 'ज्ञ' किरणं बायकांना ठाऊक होतीं!

**विजया**— मग अमृतरावांचं मन मला आधीं कसं कळलं नाहीं?

**चंद्रिका**— त्याचं कारण असं कीं, भावनेचं भिंग एखादे वेळेस मलिन झालेलं असतं आणि म्हणून हीं 'ज्ञ'-किरणं चांगलं काम करीत नाहींत.

**विजया**—चंदा, ही तुझी अलंकारिक भाषा सोडून दे, आणि साध्या गद्यांत तूं माझं मन कसं ओळखलंस तें सांग. मी तर बाई माझं मन लपवीत होतें.

**चंद्रिका**—म्हणूनच तें लक्षांत आलं! कोणाला कधीं न लाजणारी तूं त्यांना लाजूं लागलीस, यावरून मीं ओळखलं! लज्जेसारखं चुगलखोर दुसरं कोणी नाहीं!

**विजया**—पण तूं मात्र माझी चुगली त्यांच्याजवळ करूं नकोस हो. सगळ्या गोष्टी योग्य वेळींच झाल्या पाहिजेत.

**चंद्रिका**—विभाकरांना तुझं हृदय कळायचं राहिलं आहे, होय? अग, वायकांनीं आपलं हृदय किती जरी लपविलं तरी तें वर डोकावतंच.

**विजया**— अस्सं! बरीच आहेस कीं ग! बाकी माझ्यापेक्षां कमी शिकलेली असलीस तरी अधिक चाणाक्ष आहेस हें कबूल केलंच पाहिजे. उगाच का अमृतरावांचं मन आपलंसं करून घेऊं शकलीस!—ते जर या दोन खटल्यांतून सुटले, तर तुमचं लग्न तावडतोब उरकून घ्यायचं हो—आणि मी करवली होणार!

**चंद्रिका**—आणि तुझ्या लग्नांत मी करवली होणार! बाकी (सुस्कारा सोडून) ते सुटले नाहींत म्हणजे हे सगळे मनांतले मांडेच ठरायचे.

**विजया**— राजद्रोहाच्या खटल्यांतून अमृतराव सुटतील असं बाबा म्हणत होते.

**चंद्रिका**— आणि दोघांवरच्या पिस्तुलाच्या खटल्यांत--

**विजया**— त्यांतूनहि दोघे बहुधा सुटतील. पण त्यांत थोडी भीति आहे असं बाबा म्हणाले. पिस्तूल ज्यांनीं त्यांच्याजवळ दिलं तो जर आपणांस दाखवतां आला असता, तर सुटका खात्रीनं झाली असती; कांहीं झालं तरी इंग्रजी राज्यांत पुष्कळ न्याय आहे आणि या खटल्यांत युरोपियन जज्ज आहे हें फार चांगलं आहे.

**चंद्रिका**—म्हणून तर आशा आहे. बाबासाहेबांचे फारच उपकार आहेत हो आमच्यावर! त्यांनीं पदरमोड करून काम केलं असं कोण करणार? आणि त्यांनीं उलटतपासणी किती छान घेतली! पोलिसांना

पुरावा सावरतां सावरतां नाकीं नव आले. आणि शेवटच्या बचावाच्या भाषणांत कमालच केली म्हणे बाबासाहेबांनीं ! तावदानावर दगड मारला म्हणजे त्याच्या जशा ठिकऱ्या उडतात तशा त्यांच्या भाषणानं विरुद्ध-पक्षाच्या ठिकऱ्या उडाल्या. असं परिणामकारक भाषण पांच-दहा वर्षांत ऐकलं नव्हतं, असं सरकारी वकील देखील वकिलांच्या खोलींत म्हणत होते.

**विजया**—जस्टिस् फेअर-माइंड हा नांवाप्रमाणेंच चांगला आहे म्हणतात. ( **अंगार** त्यांच्या समोरून जातो. त्या त्याच्याकडे तिरस्कारानें पाहतात व तो आपल्याजवळच्या बाकावर बसत आहे असें पाहून दुसरीकडे जाऊं पाहतात—तों तोच उठून जातो. )

**चंद्रिका**—जस्टिस् फेअर-माइंडबद्दल काय म्हणत होतीस ?

**विजया**—तो फार चांगला आहे म्हणतात. कोणाला भीत नाहीं. तो न्याय देईल असं वाटतं. निकाल आतां एक-दोन घटकेंतच कळतील. मी कोर्टांत जाणार होतें ऐकायला, पण बाबा म्हणाले कोर्टांत गर्दी फार होईल, येऊं नकोस.

**चंद्रिका**—बाबांचं ऐकायला लागलीस वाटतं ?

**विजया**—अनुभवानं दुराग्रह कमी होतो.

**चंद्रिका**—मी पण जाणार होतें; पण आमचं प्रेम जगजाहीर झालं आहे ना ? तें तुझ्यासारखं गुलदस्तांत नाहीं, म्हणून सगळ्या लोकांच्या नजरा माझ्याकडे लागतील, नि मला कसंसंच होईल, म्हणून म्हटलं जात नाहीं. बाकी सुटका झाली तर मंडळी इकडेच येतील—

**विजया**—अमृतरावांना सांगून ठेवलं असशील—

**चंद्रिका**—विभाकरपंतांनाहि सांगितलंय् कीं, तूं तिकडेच येणार आहेस. सुटका झाली तर तेहि इकडेच येतील बरं का, विजू ? बरं, पण मुख्य काम राहिलंच. आज मुद्दाम इकडे कां बोलावलंस ? कांहीं तरी सांगणार होतीस मला. विभाकरपंतांचं आणि तुझं जुळलं आहे, हें तर मीं तूं न सांगितल्या-शिवाय ओळखलं आहे.

**विजया**—तें नव्हतं सांगायचं. दुसरं थोडं सांगायचं आहे.

**चंद्रिका**—दुसरं काय आणखी ? मुहूर्तहि ठरलाय् कीं काय ?

**विजया** —त्याविषयीं नाहीं, दुसरंच एक गुपित आहे. एक कपट-नाटक करायचं आहे मला.

**चंद्रिका** —अमृतरावांनीं तुझ्याशीं कपट-नाटक केलं, त्याबद्दल त्यांच्यावर सूड घ्यायचा आहे वाटतं? तसलं कांहीं मनांत आणूं नकोस हो; क्षमा कर त्यांना.

**विजया** —क्षमा कसली करायची? उलट, त्यांच्याबद्दल आदर वाटत आहे मला. अमृतरावांच्यासारखीं थोर माणसं, पर्जन्यदेवासारखीं असतात. एरव्हीं पाऊस धाडून फळां-फुलांची समृद्धि करतील; पण मनांत लहर आली तर काळे ढग उत्पन्न करून पाऊस पाठवण्याचं नुसतं ढोंग करतील! त्यांनीं ढोंग केलं हें खरं, पण हें चालायचंच—

**चंद्रिका** —पण तुझ्या कपट-नाटकाचा प्लॉट काय?

**विजया** —इकडे ये! (सभोंवतीं पाहत) हळू सांगतें. मला अलीकडे असा संशय येऊं लागला आहे कीं, हें पिस्तुलाचं प्रकरण त्या मेल्या अंगारनं घडवून आणलं आहे. त्या मेल्या अंगारची सगळी कारवाई आहे ही. नर्मदेच्या बोलण्यावरून मला ही कल्पना सुचली. डॉ. रोखीवाल्यांच्या इस्पितळांतून बाहेर पडतांना त्याची चोरासारखी मुद्रा पाहिली तेव्हांच मला संशय आला होता कीं, हा कांहीं तरी दगाबाजी करीत आहे. नर्मदेच्या बरोबर परवां बोलत असतांना कल्पना मनांत आली कीं, पिस्तुलाचं कुभांड अंगारनं तर रचलं नाहीं ना? आणि मला असा संशय येतो कीं, सरकार शोधीत आहे तें दुसरं पिस्तूलहि त्याच्याजवळच असलं पाहिजे.

**चंद्रिका** —बरं मग तुझं कपट-नाटक काय आहे?

**विजया** —त्याच्यावर प्रेम आहे असं सोंग करून त्याच्याजवळ तें पिस्तूल आहे का, तें काढून घेऊं या! 'आहे' असं कळलं तर सरकारांत कळवून त्याला पकडायचं. सरकारला एकदां खरं कळलं कीं, मग अंगार डिटेक्टिव्ह असला तरी त्याच्यावर दयामाया होणार नाहीं. सरकारजवळ ती लटपट नाहीं.

**चंद्रिका** —पण तो आपल्याजवळ पिस्तूल आहे हें कशाला सांगेल?

**विजया**—प्रेमानं मनुष्य पागल बनतो, चंदू! आणि तो तर आधींच अर्धा-अधिक पागल आहे. प्रयत्न करून पहायला तरी हरकत नाहीं.

**चंद्रिका**—विजू, अंगार म्हणजे विस्तव; त्याच्याशीं हे खेळ खेळायचे आहेत हें ध्यानांत ठेव. आपणच एकादे वेळेस भाजून निघूं.

**विजया**—मी तरी प्रयत्न करून पाहणारच. प्रेमाचा बहाणा तुला करतां यायचा नाहीं. तुला इथं बोलवायचं कारण असं कीं, अंगार नेहमीं बायकांचे चेहरे पाहायला या बागेंत टिवल्याबावल्या करीत असतो. तेव्हां त्याची सहजासहजीं इथं गांठ पडेल आणि त्याच्याशीं ॲक्टिंग करायला, तुझी सम्मति मिळाल्याबरोबर संधि मिळेल. तो पहा, येतोच आहे वाटतं पुन्हा इकडे. मी करूं ना हें ॲक्टिंग?

**चंद्रिका**—पण, बाई, जरा धोक्याचंच—

**विजया**—करतें ग—जरा बाजूला जाऊन बैस! फाजीलपणा करायला लागला तर तुला हाक मारीनच.

**चंद्रिका**—बरं आहे. तूं काय माझं ऐकणार आहेस थोडंच? (बाजूस जाते.) (**अंगार** दुसऱ्या बाजूनें विजयेकडे येतो.)

**विजया**—या अंगार! तुम्ही या बागेंत वरचेवर दिसतां पण बोलत नाहीं. ठीक चाललं आहे ना?

**अंगार**—आमचं कसलं काय?

**विजया**—असं कसं होईल? विभाकरपंतांकडून निघालांत फार चांगलं झालं. विभाकरपंतांनीं सोडलं म्हणून तुम्हांला काय कमी पडणार आहे? तुमच्यासारख्या स्वावलंबी लोकांबद्दल मला फार आदर आहे!

**अंगार**—तुमचा हा थोरपणा आहे.

**विजया**—आतां काय सी. आय्. डी.मधें आहांत वाटतं नोकरीस—?

**अंगार**—अं–अं–लोक आपलं म्हणतात झालं.

**विजया**—सांगूं नका. पण मला ठाऊक आहे. अंगार, तुमच्याबद्दल मला एवढा आपलेपणा वाटतो आणि तुम्ही मला परक्यासारखे लेखतां हें बरं आहे का? मला देखील खरं नाहीं सांगायचं!

**अंगार**—मी कुठं खरं सांगत नाहीं? (इकडे तिकडे पाहत) आहें–डिटेक्टिव्ह खात्यांत आहें. तुम्हांला माझ्याबद्दल आपलेपणा वाटतो आणि मला वाटत नाहीं होय?

**विजया** —पण अलीकडे परकेपणा आलेला दिसतो-- आतांशी भेटलां तरी बोलत नाहीं कांहीं-- मला किती किती भेटावं आणि बोलावंसं वाटतं तुमच्याशीं—

**अंगार** —मी आपली सेवा करायला केव्हांहि तयार आहें.

**विजया** --खरं? सांगेन ती सेवा?

**अंगार** --तुमचा माझ्यावर एवढा लोभ असला-- तर मी तुमच्या जिवाला जीव देणार नाहीं असं वाटतं?

**विजया** --( इकडे तिकडे पाहिल्यासारखें करून ) मला तुमची गुप्त गांठ घ्यावयाची आहे.

**अंगार**—चला. माझ्या मित्राची- कुठारची- खोली इथं जवळच आहे.

**विजया** —नाहीं तर, इथंच हळूहळू बोलूं या. आसपास कोणी नाहीं. या-जवळ या, लाजूं नका, परकेपणा ठेवायचा नाहीं म्हटलं ना?

**अंगार** —काय? काय सेवा करूं?

**विजया** —सांगेन ती कराल ना?

**अंगार** --सांगून पहा—

**विजया** --तुम्ही सांगाल ते मीं ऐकायचं, आणि मी सांगेन तें तुम्हीं ऐकायचं, ठरलं ना?

**अंगार** --ठरलं म्हणजे ठरलं.

**विजया** —पहा हो! मागें घ्याल शब्द! मग म्हणाल—

**अंगार** —पाहिजे तें काम सांगा-- एखाद्याचा जीव घ्यायला सांगितला तरी देखील घेईन. पहा सांगून! हा अंगार—

**विजया** --कशाला नाटकी आविर्भाव करतां! एखाद्याचा जीव घ्यायला तुमचं काय तोंड लागलंय? जीव घेईन म्हणतां, कसा घ्याल हो जीव—?

**अंगार** —पाहिजे तसा, विष घालून, गळा दाबून, पिस्तूल मारून— ( जीभ चावून व चपापून ) एक का साधन आहे जीव घेण्याचं!

**विजया** —( मनांत ) पिस्तुलाबद्दल कांहीं तरी पाणी मुरतंय. ( उघड ) खरंच मला विष आणून द्याल का?

**अंगार** --कशाला?

**विजया** —मला आपलं पाहिजे. मी सांगेन तें काम करायचं कबूल केलं आहे ना ?

**अंगार** —खरं, पण— ( ती रागावते )

**विजया** —मग असं करा—( स्वतःशीं पुटपुटते असें दाखविते.) विषापेक्षां पिस्तूल असलेलं बरं. अंगार, एवढं काम केलंत तर तुम्ही सांगाल तें तुमचें काम करीन.

**अंगार** —विष मिळवून देणं जरा कठीण आहे. पिस्तूल—

**विजया** —विष मिळवणं कठीण असलं तर पिस्तूल, नाहीं तर दुसरं काय वाटेल तें द्या. एवढं माझं काम करणार ना अंगार!

**अंगार** —पाहूं—करूं—पाहूं—

**विजया** —पाहूं पाहूं नाहीं—

**अंगार** —पाहूं हो—घाई काय आहे ?

**विजया** —मला घाई आहे. विष द्या आणून. नाहीं तर पिस्तूल, हो—पिस्तूलच बरं. ठरलंच. मग केव्हां देणार ? बोला—

**अंगार** —पण—

**विजया** —समजलं—माझ्यावर विश्वास नाहीं तुमचा. मी सर्वस्व द्यायला तयार झालें तरी—

**अंगार** —तसं नाहीं—पण आजच कशाला—?

**विजया** —द्यायचं तर आजच घ्या. मला अगदीं धीर नाहीं निघत. माझा स्वभाव तुम्हांला ठाऊक आहे.

**अंगार** —पण—पिस्तूल कुठलं आणूं मी ?

**विजया** —तुमच्यावर विश्वास ठेवून मागणारी मीच वेडी ? बायकांना समजत नाहीं म्हणतात तेंच खरं. मी तुमच्याकरितां कुलाकडे पाहत नाहीं, शीलाकडे पाहत नाहीं, कशाकडेही पाहत नाहीं, तरी तुमचा विश्वास कुठें आहे माझ्यावर ! अन् मी तरी कशाला—

**अंगार** —असं रागावण्यांत काय अर्थ आहे ?

**विजया** —मी रागवत नाहींच मुळीं—आपलेपणा नाहीं, विश्वास नाहीं, मग रागावणार कोणावर ?

**अंगार**—आपलेपणा नाहीं कोण म्हणतो ?

**विजया**—मला आजच्या आज पिस्तूल मिळालं तर आपलेपणा आहे असं समजेन—नाहीं तर नाहीं.

**अंगार**—देईन—देईन—जराशानें देईन. पण पिस्तूल दिल्यावर भलतं कांहीं केलंत तर माझ्यावर शेकेल ना ? मला सांगा म्हणजे मी व्यवस्थित तरी करीन. नाहीं तर दोघंहि आपण गोत्यांत येऊं. पिस्तुलानं कुणाला—

**विजया**—कुणाला नि काय ? तुम्हांला काय करायचं आहे ? त्या पिस्तुलानं तुम्हांलाच मारायचं आहे. झालं !

**अंगार**—अग, पण सांगितलंस तर, बोभाटा होणार नाहीं. असं—

**विजया**—सांगेन—इतका तुमच्यावर विश्वास ठेवला आहे मीं, तर पुढचं सांगणार नाहीं का ? आतां नुसतं पिस्तूल दाखवा–मग तुमच्याकडे—नाहीं तर कुठं तरी काय करायचं तें ठरवूं. तुम्हांला असल्या गोष्टी माझ्या-पेक्षां चांगल्या समजतात हें ठाऊक आहे मला. जा, आतां नुसतं आणून दाखवा.

**अंगार**—बरं. आज नुसतं दाखवीन बरं का ?

**विजया**—हो तसंच. जा लवकर आणि घेऊन या. ( अंगार एका बाजूस जातो. विजया दुसऱ्या बाजूस हिंडूं लागते.)

**अंगार**—( स्वगत ) मला नाहीं तरी पिस्तूल कुणाच्या तरी गळ्यांत बांधायचं होतंच. तेव्हां हें ठीक होतंय्. या विजयेजवळ देऊन टाकलं म्हणजे दुहेरी काम साधेल. प्रेमाचे खेळ चालूं देईपर्यंत बोलूं नये. पुढें पोलिसांत वर्दी देऊन तिला पोलिसांच्या ताब्यांत द्यावी आणि वर शाबासकी मिळवावी. उत्तम जमला बेत ! [ जातो.

**विजया**—( आपल्या जागीं येऊन ) चंदू, चंदू, इकडे ये. लवकर ये.

**चंद्रिका**—काय ? काय झालं ग ?

**विजया**—अपेक्षेबाहेर काम फत्ते ! इतक्या लवकर तो बधेल असं वाटलं नव्हतं. पुरुष पागल खरे !

**चंद्रिका**—म्हणजे ? त्यानं आपल्याजवळ पिस्तूल आहे असं कबूल केलं वाटतं ?

**विजया** —तो तें घेऊनच येत आहे. त्याला मुद्देमालासह पकडण्याकरितां चौकीवरून पोलीस घेऊन ये. तोंपर्यंत मी त्याच्याशीं इथं बोलत राहीन. मी शिटी वाजवीन, ती ऐकल्याबरोबर पोलिसांना इकडे घेऊन ये. गंमत होणार आहे मोठी आज इथं!

**चंद्रिका** —विभाकरपंत आणि अमृतराव खटल्यांतून सुटले तर मग फारच बहार होईल.

**विजया** —सुटतील, सुटतील. चांगलं बोलत राहावं.

**चंद्रिका** —आणि वाईट करीत राहावं! खोटं प्रेम दाखविण्याचा अभिनय तुला म्हणूनच करतां आला. आमच्यासारख्यांना जमायची नाहीं ही कला.

**विजया** —चांगलं साधण्याकरितां खुशाल वाईट करावं, हें तुझ्या अमृत-रावांपासूनच शिकलें! उसाला मासोळीचं खत घालतात, तसंच चांगलं साधण्याकरितां—

**चंद्रिका** —मला त्यांचंहि आवडलं नाहीं आणि तुझंहि फारसं पटत नाहीं. तुमचे हेतु चांगले, म्हणून बोलायचं नाहीं एवढंच.

**विजया** —शिवाय अंगारजवळ दुसरं पिस्तूल सांपडलं म्हणजे अमृत-रावांवरचा आरोप दूर होईल म्हणून नाहीं बोलायचं, खरं ना?

**चंद्रिका** —विभाकरपंतांच्या वरचाहि आरोप दूर होईल–हाहि एक तुझा हेतु आहे या खटपटींत, खरं ना—? अग, ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी!

**विजया** —बोरी-बाभळींचा प्रेम-कलह आतां लांबला तर वेळ जाईल. तूं जा आतां. सांगितल्याप्रमाणं सगळं झालं पाहिजे हो. (चंद्रिका जाते.) आतांपर्यंत तरी माझं अंगावरच्या प्रेमाचं नाटक यशस्वी झालं आहे. आतां अखेर साधली म्हणजे झालं. (विचार करीत) बाकी अशा हलकट माणसाशीं प्रेमाचा अभिनयहि किळसवाणा वाटतो. पण करायचं काय? अंगार-सारख्यांच्या कपटाचा कांटा कपटानेंच काढतां येईल; एरव्हीं तो निघायचा नाहीं. (थांबून) अजून कां बरं अंगार येत नाहीं? (दूर पाहून) कुणी तरी येताय वाटतं? माझा हा डाव यशस्वी झाला, तर विभाकरांना माझ्या-बद्दल काय वाटेल? ते काय म्हणतील? यश आलं तर बरं म्हणतील; नाहीं

तर मूर्खांत काढतील ! पण मी म्हणेन— पण हे विचार इथं कशाला ? अंगारचं यथायोग्य स्वागत करण्याची तयारी केली पाहिजे. प्रेमाचं कृत्रिम हास्य चर्येवर आणलं पाहिजे. (आरशी काढून त्यांत पहात पहात) पिस्तूल आणलं तर असं हसायचं, नाहीं आणलं तर असं रागवायचं. अं हं–अस्सं. आणि रुसायचं असलं, तर अस्सं. नाहीं तर अस्सं. आणि खोटं प्रेम दाखवायचं असलं तर अस्सं हसावं म्हणजे झालं.

( **विभाकर** प्रवेश करतो. )

**विभाकर** —किती दिवसांनीं हें हास्यपूर्वक स्वागत आहे ?

**विजया** —हें हास्य प्रेम-सूचक आहे असं वाटतं का ?

**विभाकर** —मला तरी वाटतं.

**विजया**—खरं प्रेम आणि नाटकी प्रेम पुरुषांना कळत नाहीं असं म्हणतात तें खरंच.

**विभाकर** —नाटकी प्रेमाचा मला फारसा अनुभव नाहीं.

**विजया** —अमृतरावांना आहे पण. मलाहि आहे—आतां मी नाटकी प्रेमच करीत आहें.

**विभाकर** —नाटकी प्रेम ?

**विजया** —हो ! कुणावर नाटकी प्रेम आहे तें ओळखा ?

**विभाकर** —माझ्यावर तुझं प्रेम नाटकी असेल तर या जगांत खरं प्रेम नाहीं असंच म्हटलं पाहिजे. (दुर्मुखला होतो.)

**विजया** —असं वाईट वाटून घेऊं नका. मी किनई अंगारला फसवण्याकरितां नाटकी प्रेमाचा अभिनय आतां शिकत होतें.

**विभाकर** —म्हणजे काय ?

**विजया** —(त्याच्या कानांत) अशाकरितां—समजलांत ?

**विभाकर** —हो, चागलं आहे डोकं.

**विजया** —तुम्ही लवकर कसे आलांत ? खटल्याचा निकाल कळला का ?

**विभाकर** —राजद्रोहाच्या खटल्यांतून अमृतरावांची सुटका झाली आहे. अमृतरावांच्याभोंवतीं भक्तांची गर्दी आहे म्हणून तो येऊं शकला नाहीं.

आतां थोडी सुट्टीची वेळ आहे. ती संपल्यावर पिस्तुलाच्या खटल्यांत आमचं काय होतं तें समजणार आहे. त्यांत आम्हांला शिक्षा होणार असं दिसताय.

**विजया** —कशावरून ?

**विभाकर** —पिस्तूल कोणीं दिलं हें आम्हांला सांगतां येत नाहीं, मग आम्ही कसे सुटणार ? आमच्या म्हणण्यावर विश्वास ठेवणं न ठेवणं जज्जावर अवलंबून राहील.

**विजया** —पिस्तूल कोणी आणून दिलं त्याचा लवकरच साक्षीपुराव्यानिशीं पत्ता लावून देईन; पण आतां काय उपयोग ? ही युक्ति आधीं सुचली पाहिजे होती. शिक्षा झाल्यावर हा पुरावा मिळून उपयोग काय ?

**विभाकर** –उपयोग कां नाहीं ? अपिलांत सुटूं. बरं मी आतां जातों. आरोपी आहें मी. वेळेवर हजर झालं पाहिजे. नाहीं तर पोलीसच पकडायला येतील ! ( हळूच ) अंगारनं पिस्तूल आणलं तर तें त्याच्याजवळ राहूं दे. मुद्देमालासुद्धां त्याला पकडलं पाहिजे. नाहीं तर तूं तें आपल्या हातांत घेशील, आणि अंगार तुझ्यावरच डाव उलटवील !

**विजया** –-इतकं मला समजताय्.

**विभाकर** —लुच्चेगिरीचं ज्ञान बायकांना जन्मापासूनच असतं ! आज चंद्रिका कुठं दिसत नाहीं.

**विजया** —ती तिकडे आहे.

**विभाकर** —(पाहून) ती येतेच आहे वाटतं इकडे. मी जातों बरं का आतां. गेलंच पाहिजे. ( चंद्रिकेस ) मी आतां बोलत नाहीं बरं कां. सगळं हिला सांगितलं आहे. [ जातो.

**चंद्रिका** –-चौकीवर जाऊन पोलिसांना घेऊन आलें आहें मी. तिकडे त्यांना उभं केलं आहे. बरं, खटल्याचं काय झालं ? काय म्हणत होते विभाकरपंत ?

**विजया** –-अमृतराव राजद्रोहाच्या खटल्यांत निर्दोषी म्हणून सुटले हें सांगण्यासाठीं विभाकरपंत उभ्या उभ्या आले होते—

**चंद्रिका** –-आम्हांला सांगायला कोण येताय्.

**विजया** —अमृतरावांच्याभोंवतीं त्यांच्या चहाभक्तांची गर्दी, म्हणून ते येऊं शकले नाहींत, नाहीं तर तेहि येणार होते.

**चंद्रिका** —पिस्तुलाच्या खटल्याचा काय निकाल लागला ?

**विजया** —त्याचा निकाल लागायचा आहे, म्हणून तर विभाकरांना घाईघाईनें जावं लागलं.

**चंद्रिका** --काळजी आहे मोठी. ईश्वराची काय योजना असेल ती खरी.

**विजया** --बरं तूं जा आतां-लपून बस. अंगार आलाच वाटतं. ( चंद्रिका जाते.) ( मनांत ) आतां ॲक्टिंगची पुन्हा परीक्षा आली. त्यांत पास झालें तर मग सिनेमा नटी व्हायला कांहीं हरकत नाहीं—

( **अंगार** प्रवेश करतो.)

**अंगार** —अं हं. सांपडत नाहीं बुवा तें ! मित्रानं कुठं तरी भलत्याच ठिकाणीं ठेवलेलं दिसतं.

**विजया** —असं कसं भलतीकडेच ठेवील ?

**अंगार** --अग तें जपून ठेवावं लागतं. लोकांच्या सहज हातीं लागेल असं ठेवून चालत नाहीं.

**विजया** —बायकांचं मनहि लोकांच्या सहज हातीं लागेल असं ठेवून चालत नाहीं ! हातीं लागलं आहे असं वाटलं तरी-तें दूर जातं! जातें बरं कां मी ! आतां पुन्हा गांठ नाहीं पडायची—

**अंगार** —अग, थांब, गांठ कशी नाहीं पडायची ?

**विजया** --पिस्तूल सांपडलं असतं म्हणजे गांठ पडली असती. लग्नाची देखील गांठ—

**अंगार** --लग्नाची देखील गांठ--?

**विजया** --गांठ कसली ती ? लग्नाची गांठ म्हणजे बेडीच ! पिस्तूल सांपडलं नाहीं तेव्हां आतां तुम्हांलाहि बेडी पडत नाहीं. सुटलेत—

**अंगार** —बायकांच्या तडाख्यांत सांपडल्यावर पुरुष कुठले सुटायला ? अग, पिस्तूल आणलं आहे. पण तें दाखवायचं नाहीं इथं. तिकडे आलं पाहिजे.

**विजया** --मी आपलं मन देखील इथें उघडं करून दाखवलं पण तुम्ही माझ्याशीं लपवालपवी चालवली आहे.

**अंगार** —लपवालपवी मुळींच नाहीं— हें पहा— या आंतल्या चोर-खिशांत आहे. पाहिलंस—?

**विजया** —तें बाहेर येऊं द्या ना ?

**अंगार** —अग असल्या वस्तु बाहेर काढायच्या नसतात! लोकांना कळलं तर—

**विजया** —मी लोक वाटतं! मग लोकांशीं कशाला हा लघळपणा करायला येतां! हाक मारूं का पोलिसांना? माझ्या पाठीशीं लागून मला त्रास देतां म्हणून सांगतें त्यांना— विनयभंगाचा खटला केला म्हणजे— ?

**अंगार** —तुझ्यापुढं इलाज नाहीं बुवा! इथं दाखवणं म्हणजे शुद्ध पागलपणा आहे!

**विजया** —माझ्याशीं असं बोलत राहणं हा पागलपणा नाहीं वाटतं? बाकी मीच पागल खरी! म्हणून तुमच्यावर विश्वास ठेवला! मला तुमच्यासारखा लपंडाव येत असता तर बरं झालं असतं. मी आपलं मन तुमच्या स्वाधीन करून बसलें, आणि तुमचं मन मात्र तुमच्या खिशांत अडकून बसलें आहे.

**अंगार** —चोराचं लक्ष लोकांच्या खिशाकडे असतं. तसं तुझं ही दिसताय्.

**विजया** —चोर-खिसे स्वतःच्या कोटाला आणि चोर ठरवितां मला! खासा न्याय! ( लाडिकपणें ) मग दाखवायचं आहे का नाहीं, तें चोर-खिशांतलं!

**अंगार** —बरं बुवा! बायकांच्यापुढें साष्टांग नमस्कार असो! ( इकडे तिकडे भीत भीत पाहत ) हें पहा— झालं समाधान! फिटलं डोळ्यांचं पारणं! का नुसतं पाहून समाधान होत नाहीं, बार उडवायला पाहिजे!

**विजया** —बार मी उडवतें! आतांच उडवतें—

**अंगार** —शहाणीच आहेस!

**विजया** —बार उडवीन— पण— पिस्तुलाचा नाहीं.

**अंगार** —म्हणजे काय ?

**विजया** —आधीं पिस्तूल आंतल्या खिशांत ठेवा. अशा ठिकाणीं दाखविण्याचा पागलपणा करतां का नाहीं, हें पाहण्याकरितांच मीं हट्ट धरला. पागल आहांत शुद्ध!

**अंगार** —अं ! म्हणजे माझ्यावरच बाजू उलटली म्हणायची !

**विजया** —अहो ! मीं पुष्कळ हट्ट धरला. तुम्हांला विचार नको होता का ? ( स्वर बदलून ) वाईट वाटून घेऊं नका. थट्टा केली.

**अंगार** —तुमचं काम मीं केलं आहे. आतां माझं काम ( थाबून ) आज झालं पाहिजे

**विजया** —आजच्या आज चांगलं काम करतें—

**अंगार** —अं ?—

**विजया** —बरं—आतां कुठं तरी जाऊन बसूं या गप्पा-गोष्टी करीत. (एका बाकावर बसतात. **कुठार** येतो.)

**कुठार** —राजद्रोहाच्या खटल्यांत अमृतराव सुटले बरं का ? पिस्तुलाच्या खटल्यांत मात्र सांपडले आहेत.

**अंगार** —ही बातमी शिळी झाली आहे आतां.

**कुठार** —( विजयेबद्दल खुणेनें अंगारास विचारतो.)

**अंगार** —तुला काय करायचं आहे ?

**कुठार** —अस्सं ! कामं करायचीं असलीं म्हणजे तेवढा मी, एरव्हीं नको ! पाहून घेईन बच्चमजी— [ जातो.

**विजया**—कोण गेला तो ? त्याला कुठं तरी पाहिल्यासारखं वाटतं.

**अंगार** — आहे, एक माझा हरकाम्या मित्र. ( विजयेच्या हातांत शिटी दिसते ती पाहून ) अजून लहान मुलीसारख्या शिट्या वाजवतां वाटतं.

**विजया** —हो ! पण ही शिटी किती फुंकली तरी वाजतच नाहीं !—

**अंगार** —जोरानें फुंका म्हणजे वाजेल.

**विजया** —( जोरानें शिटी फुंकते. शिटीचा आवाज होतो. विजया अंगारकडे पाहून मिस्किलपणें हसते ).

**अंगार** —अशी हसतेस काय ?

**विजया** —मग अशा आनंदाच्या वेळीं काय रडूं ?

( **चंद्रिका** व **पोलीस** येतात. )

**पो. अम्मलदार** —अंगार, तुझी झडती घ्यायची आहे. उघड बटणं ! काढ, त्या खिशांत काय आहे तें. त्या नाहीं, त्या आंतल्या, आंत आणखी एक

खिसा दिसतोय्. आंत आहे कांहीं तरी, हं, काढ तें. (अंगार पिस्तूल काढतो.) कोठून आणलंस हें ?

**अंगार** —यांनीं मजजवळ ठेवायला दिलं.

**पो. अम्मलदार** —कोणी कोणाला काय दिलं तें सगळं आतां बाहेर निघेल. इंग्रजी राज्य आहे, अंधार-नगरी नाहीं. आपण सगळं करून-सवरून लोकांचीं नांवं घ्यायचीं काय ? आम्हांला तुझा संशय होताच; पण पुराव्याची वाट पाहत होतों, तो आज मिळाला. हा तुझा मित्र कुठार पळून जात होता तो इथंच सांपडला आहे. त्यालाहि आणला आहे बरोबर. तोहि काय आहे तें सगळं सांगेल.

**कुठार** —साहेब, यांत माझा कांहीं संबंध नाहीं, बरं का ? यानेंच माझ्या-कडे हें खोलींत आणून ठेवलं होतं आणि दुसरं एक पिस्तुल चांगल्या पेटींत घालून यानेंच मला या बाईच्या हातांत घ्यायला कांहीं दिवसांपूर्वी सांगितलं होतं.

**पो. अंमल** —चौकशीच्या वेळीं सगळं सांग—आतां गप्प बैस (शिपायास) यालाहि पकडा.

**विजया** —( अंगारकडे वळून ) मघांशी म्हटलं त्याप्रमाणं बेडी पडली ना ? झालं मनाजोगतं !

( **अमृतराव, विभाकरपंत, उद्धवराव** येतात. अभिनंदन करणाऱ्यांचा घोळका. अमृतराव व विभाकरपंत मंडळींचा निरोप घेतात.)

**अमृत** —( चंद्रिकेस ) राजद्रोहाच्या खटल्याचा निकाल झाला; सुटलों. पिस्तुलाच्या खटल्यांत चार्ज ठेवला आहे, पण बाबासाहेबांनीं लगेच अर्ज देऊन जामिनावर सोडवलं आहे. आपिलांत सुटूं असं दिसताय्. पिस्तूल ज्यांनीं दिलं त्याचा पत्ता लागला म्हणजे खात्रीनें सुटतोंच आम्ही.

**विजया** —लागलाच आहे पत्ता. सगळं सांगतें ( खुणेनें अंगार, कुठार दाखवते.)

**अमृत** —अस्सं. एकंदरींत अंगारला आश्रय दिला त्याबद्दल त्यानें असं भाजून काढलं.

**उद्धवराव** —जाऊं द्या, जग हें असंच आहे.

**विभाकर** --बाबासाहेब, आपले आमच्यावर फार उपकार झाले.

**अमृत** --आपलं कालचं आणि आजचं भाषण इंग्लंडमधल्या कार्सन वगैरे बॅरिस्टरांना शोभेल असं होतं.

**उद्धवराव** --अहो, भाषणावर कांहीं नाहीं. जस्टिस फेअर-माइंड हा जज्जच चांगला. तुम्ही जहालांनीं कांहीं म्हटलंत तरी इंग्रजी राज्यांत न्याय आहे.

**अमृत**--आम्ही कुठें नाहीं म्हणतो ? आमचा व्यक्तीवर रोख नसतो, पद्धतीवर असतो.

**विभाकर** —तो आतां वाद कशाला ? बाबासाहेबांचे उपकार आहेत ही गोष्ट खरी ! त्यांनीं जहाल पक्षाच्या पुढाऱ्याला त्याचे सगळे अपराध पोटांत घालून--

**उद्धवराव** --अहो, आम्ही म्हातारे प्रागतिक बाहेरून कितीहि कठोर दिसलों, तरी तुमचं वाईट व्हावं असं का आमच्या मनांत असतं ? ( हसून ) आणि खरं सांगूं का ? मीं हें उगाच केलं नाहीं. जगांतल्या पुष्कळश्या बऱ्या-वाईट गोष्टींच्या बुडाशीं स्त्री हें कारण आहे. आमची ही विजू, हिच्याकरितां–( विभाकरपंतांकडे पाहून ) हिचे उपकार माना–

**विजया** --कांहीं तरीच.

**चंद्रिका** —या विजूचे तरी उपकार कमी आहेत का ? पिस्तुलं या अंगार-जवळ होतीं–हें हिनंच ओळखलं. आणि त्याला हिनंच युक्तीनं पकडलं आहे.

**अमृत** —पण युक्ति केली तरी काय ?

**चंद्रिका** —ती मागाहून सांगेन. आतां घराकडे जाऊं या.

**उद्धव** —माझ्याकडेच चला सगळीजणं—तिथं 'ती' वाट पाहत बसली असेल. तिच्या इच्छेप्रमाणें एक-दोन महत्त्वाचीं कामं आज तिथें करून घ्यायचीं आहेत.

**विजया** —कोणतीं ?

**उद्धव** —विजू, विभाकरपंत चतुर्भुज होणार होते या खटल्यांत; पण तूं त्यांना सोडवलंस. तरी मी त्यांना चतुर्भुज करणारच ! काय विभाकरपंत, तुमची कांहीं हरकत नाहीं ना ?

**विभाकर** —माझी तर केव्हांच हरकत नव्हती. पाहिजे तर आजच—

**विजया** —अपिलाचा निकाल होईपर्यंत देखील वाट पाहवत नाहीं वाटतं! म्हटलं, उतावळं होऊन गुडघ्याला बाशिंगं बांधायला नकोत—

**उद्धव** —आणि अमृतराव, तुम्हांलाहि बेडी पडणार होती ती टळायची नाहीं हो! काय, चंदू, खरं ना? बेडी पडायची आहे!

**चंद्रिका** —( आनंदानें ) इश्श.

**अमृत** —विजूताई, मध्यंतरीं मीं जें वेडेपणाचं नाटक केलं त्याबद्दल मला पश्चात्ताप होत आहे. पुष्कळ दिवस हें शल्य माझ्या मनांत राहील.

**विभाकर** —तुझं नाटक शोकान्त व्हायचं, पण नशिबानं आपण वांचलों.

**अमृत** —विजूताई—तूं मला क्षमा करणार ना?

**विजया** —क्षमा केलीच पाहिजे, पण विस्तवाशीं खेळ खेळूं नयेत.

**अमृत** —हें तत्त्व अनेक क्षेत्रांतल्या अनुभवांनीं मनांत पुरतं बिंबवलं आहे आणि विभाला तर तें मीं बोलूनहि दाखविलं आहे. विचार पाहिजे तर—

**विजया** —उंदरानं मांजराची साक्ष–किंवा अंगारनें कुठारची साक्ष–काढण्यासारखंच आहे हें.

**उद्धव** —झाल्या गोष्टी झाल्या. अखेर सुरेख तें, सर्व सुरेख. आतां शुष्क वाद कशाला? आपल्या कलहाच्या मंथनापासून आनंदाचं अमृत निघालं आहे. आतां कडवट आठवणींचं विष कशाला?

**विजया** —आनंदी आनंद गडे, इकडे तिकडे चोंहिकडे!

**उद्धव** —चोंहिकडे नाहीं, थोडा उणेपणा आहे. आमचा एक चक्रधर तेवढा तसाच राहतो आहे. मिळेल—त्यालाहि कोणी तरी मिळेल! हिंदुस्थानांत मुली पुष्कळ आहेत!

**विजया** —नर्मदेशीं लग्न करायला तयार आहे का तो? ती आहे तयार. मीं विचारलं आहे तिला.

**उद्धव** —कांहीं वाईट नाहीं. त्याला विचारलं पाहिजे. (त्याचेकडे पाहतो).

**चक्रधर** —तुमची सगळ्यांची इच्छा असली तर माझी ना नाहीं.

**उद्धव** —उत्तम! ( अमृतरावांकडे वळून ) तुम्ही कां असे मागें मागें. आणि असे उदास कां दिसतां? अं, डोळ्यांत अश्रु दिसताहेत.